
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन



अनुक्रमणिका

**संपादक :** प्र.ना. परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा. केळकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण

**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११००७.
दूरध्वनी (०२०) २५६०४६१७ / ०४२२५००६३८

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा. १२५०, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२.
दूरध्वनी (०२०) २४४८६०१५

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे ४११०५१.
दूरध्वनी (०२०) २४३४८७५६

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. वार्षिक वर्गणी - **संस्थेला** रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-. **व्यक्तीला** रु. १००/-पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- **परदेशात** अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.)** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'अॅट पार' नसल्यास रकमेत रुपये ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु. २,५००/-, अर्धे पान रु. १,५००/-, पाव पान रु. ८००/-, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

# अनुक्रमणिका

आवाहन /२
संपादकीय /मराठी भाषेच्या विकासाच्या वाटा-६ :राजाश्रय व लोकाश्रय/प्र.ना. परांजपे/३
अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाने प्रसृत केलेली शुद्धलेखन-प्रश्नावली/६
तीन कविता /राजेश जोशी/भाषांतर : बलवंत जेऊरकर
(१) दोन ओळींच्या दरम्यान /७
(२) अपूर्ण कविता /८
(३) आपली भाषा /९
मराठीचे लेखननियम :
मराठी प्रमाणभाषेचे लेखननियम /यास्मिन शेख/११
मराठीचे लेखनसंकेत /कल्याण काळे/१७
आगर बोली / शंकर सखाराम/२१
धनगरी ओव्यांचा लोकतत्त्वीय अभ्यास /माधुरी वि. दाणी/२६
धुळे जिल्ह्यातील दलितांच्या लोकोक्ती आणि त्यांचे सामाजिक संदर्भ / प्रकाश भामरे/३१
भाषेतील म्हणींचे संचित / विद्या वासुदेव प्रभुदेसाई/३८
ज्याची त्याची प्रचीती :
(१) हद्दपार शब्द / लीला दीक्षित/४३
(२) स्वयंपाकघरातील हरवलेले शब्द / शुभांगी रायकर/४६
'गाथा सप्तशती'तील मराठीचे दर्शन / शारदिनी मोहिते/४७
'छंदोरचने'च्या भाषांतराची निकड / शुभांगी पातुरकर/५१
पुस्तक परीक्षणे :
(१) आधुनिक समीक्षा सिद्धान्त /अविनाश सप्रे/५४
(२) एक पुस्तक-प्रवासाची कथा / विजया देव/६०
(३) भाषाभान / सुमन बेलवलकर/६७
(४) अक्षरस्पंदन / सुमन बेलवलकर/७२
(५) स्त्रीकवितेच्या अभ्यासकांस उपयुक्त ठरणारे पुस्तक / विद्यागौरी टिळक/७७
परीक्षणासाठी आलेली पुस्तके/८१
प्रतिसाद :
(१) शब्दसंक्षेप, वाक्यसंक्षेप /द.भि. कुलकर्णी/८०
(२) मराठी भाषेतील सौजन्य /डॉ. प्र.चिं. शेजवलकर/८२
(३) वऱ्हाडी बोलीची उच्चारप्रवृत्ती /रावसाहेब काळे/८३
श्रद्धांजली/५०
लेखकांसाठी सूचना/४२,४५,५९
पानपूरके /५,१६,२०,२५,३०,३७,७१,७६,७९

मुखपृष्ठावरील रेखाचित्र : अनिल अवचट मांडणी : विनय सायनेकर, सुप्रिया खारकर

# आवाहन

(१) मराठीबद्दल आस्था असणाऱ्या, मराठीचे अध्ययन-अध्यापन करणाऱ्या, मराठीच्या विकासासाठी प्रयत्न करू इच्छिणाऱ्या सर्वांपर्यंत 'भाषा आणि जीवन' हे नियतकालिक आणि ते प्रकाशित करणाऱ्या 'मराठी अभ्यास परिषदे'चे कार्य पोचणे आवश्यक आहे, हे आपल्यालाही पटेल. त्यासाठी आपणही काही करू शकता. आपण रु. १०००/- (किंवा त्या पटीने) देणगी दिलीत तर 'भाषा आणि जीवन'चे अंक दहा (किंवा त्या पटीत) संस्थांना (महाविद्यालये, विद्यापीठे यांचे मराठी विभाग इ.) किंवा व्यक्तींना एक वर्षभर पाठविले जातील. त्यांना पाठविल्या जाणाऱ्या पत्रात आपल्या देणगीचा उल्लेख केला जाईल आणि 'भाषा आणि जीवन'चे वर्गणीदार होण्याचे आणि (व्यक्तींना) 'मराठी अभ्यास परिषदे'चे आजीव सभासद होण्याचे आवाहन केले जाईल. अंक ज्यांना पाठवायचे त्यांची नावे व पत्ते आपण देऊ शकता किंवा ते काम आपण आमच्यावर सोपवू शकता.

या योजनेचा प्रारंभ श्री. विजय पाध्ये यांच्या रु. १०००/-च्या देणगीतून होत आहे. डॉ. वसंत जोशी (पुणे) यांनीही या आवाहनाला प्रतिसाद देऊन रु.१०००/देणगी पाठवली आहे. त्यांची संस्था आभारी आहे. आपल्या सहभागाची आम्ही वाट पाहात आहोत.

(२) **परिषदेचे संकेतस्थळ :** दि. १ मे २००८ रोजी परिषदेचे संकेतस्थळ सुरू झाले आहे. त्याचा पत्ता (**www.marathiabhyasparishad.com**). या संकेतस्थळावर परिषदेची घटना, पदाधिकारी, कार्यक्रमांची छायाचित्रे, 'भाषा आणि जीवन'चे अंक, सभासदवर्गणी इत्यादी माहिती उपलब्ध आहे. सभासदांनी या संकेतस्थळावरील मजकुराचे परिशीलन करावे, आपला अभिप्राय कळवावा आणि सूचनाही कराव्यात.

(३) मराठी अभ्यास परिषदेच्या आजीव सदस्यांनी तसेच वर्गणीदारांनी आपला **e mail** चा पत्ता कृपया कळवावा. त्यामुळे आपल्याशी संपर्क साधणे सुलभ होईल.

---



अनुक्रमणिका

# मराठी भाषेच्या विकासाच्या वाटा - ६ : राजाश्रय व लोकाश्रय

कुठल्याही भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी राजाश्रय व लोकाश्रय या दोन्ही गोष्टी आवश्यक असतात. यातल्या कोणत्याही एका आश्रयाच्या अभावी भाषेच्या विकासाचा प्रवाह अवरुद्ध होतो, कुंठित होतो. निदान हव्या त्या वेगाने तो वाहू शकत नाही. या दोन आश्रयांपैकी कोणता अधिक महत्त्वाचा हे ठरविणे अवघड आहे. सोव्हिएट रशियामध्ये रशियन भाषेला भक्कम आश्रय होता. पण त्या संघराज्यातील उझबेकिस्तान, तुर्कमेनिस्तान अशा अनेक राज्यांमध्ये रशियन भाषा फारशी प्रभावी ठरू शकली नाही; भारताच्याही विविध भागांत वेगवेगळ्या काळात पर्शियन, इंग्रजी, फ्रेंच, पोर्तुगीज या राजभाषा होत्या. पण त्या अल्पसंख्य सुशिक्षितांपर्यंतच मर्यादित राहिल्या. इंग्लंडमध्ये मात्र १६व्या शतकापासून इंग्रजीला राजाश्रय व लोकाश्रय यांचा लाभ झाला आणि त्यामुळे इंग्रजीचा विस्तार व विकास झपाट्याने झाला.

१९६० पूर्वी मराठीला राजाश्रय कधीच नव्हता. मराठीच्या गळचेपीविरुद्ध, तिला मिळणाऱ्या दुय्यम वागणुकीविरुद्ध ज्ञानेश्वरांना बंड करावे लागले. शहाजी राजांच्या पदरी असलेल्या कवींच्या यादीत मराठी कवींची संख्या संस्कृत कवींच्या तुलनेने अत्यल्प होती. शिवाजी महाराजांचा आश्रय होता तो भूषण या हिंदी कवीला. त्यांनी राज्यव्यवहारकोश तयार करवून घेतला तो संस्कृतच्या धर्तीवर. रामदास, तुकाराम यांचा राज्यकर्त्यांनी गौरव केला तो ते साधू, संत होते म्हणून; कवी होते म्हणून नव्हे ! पेशवाईतही प्रतिष्ठा होती ती संस्कृतला. १८१८नंतर राज्यकारभाराच्या सोयीसाठी मराठीची गरज भासू लागली. त्यामुळे इंग्रज राज्यकर्त्यांनी मराठी-इंग्रजी (मोल्सवर्थ) व इंग्रजी-मराठी (कँडी) हे दोन कोश तयार केले. दक्षिणा प्राइझच्या रूपाने मराठीतील ग्रंथरचनेला, भाषांतरांना उत्तेजन दिले. शालेय व पुढे महाविद्यालयीन पातळीवरील शिक्षणात मराठीचा समावेश केला. पण प्रशासन, न्यायालय इत्यादी ठिकाणी मराठीला स्थान नव्हते; प्रतिष्ठेच्या जागेवर संस्कृतच्याऐवजी इंग्रजी आली होती.

पण या काळात मराठीला लोकाश्रय मात्र होता. संत-पंत-तंत यांच्या काव्याला लाभलेली प्रतिष्ठा व लोकप्रियता यामुळे मराठीचा, मंद गतीने का होईना, विकास

होत राहिला. तिच्या भाषकांना तिच्याबद्दल अभिमान वाटत राहिला. तिचे पांग फेडण्याची ओढ त्यांना वाटत राहिली. त्यामुळे व्याकरण, पत्रकारिता, साहित्य, कोशरचना अशा तिला सशक्त करण्याच्या अनेक प्रयत्नांची परंपरा निर्माण झाली. दुर्दैवाने असे प्रयत्न राजाश्रयाच्या अभावामुळे एकांड्या शिलेदारीने होत राहिले. त्यांना संघटित, संस्थात्मक स्वरूप न लाभल्यामुळे त्यांच्यात सातत्य राहिले नाही. नवीन प्रयत्नांना पूर्वप्रयत्नांच्या अनुभवांचा व फलनिष्पत्तीचा आधार मिळत न राहिल्यामुळे प्रत्येकाला परत परत श्रीगणेशाय नम:पासून प्रारंभ करावा लागला.

१९६०नंतर हे चित्र काहीसे बदलले. पूर्वी कधी नव्हता तो राजाश्रय मराठीला लाभला. या वस्तुस्थितीला सुमारे पन्नास वर्षे झाली.

मराठीला राजभाषेचा दर्जा मिळून पन्नास वर्षे होत आली, पण पूर्वीच्या संस्कृत व नंतरच्या इंग्रजीची प्रतिष्ठा मराठीला लाभली आहे, असे म्हणता येत नाही. इंग्रजी माध्यमाच्या शाळांची संख्या दरवर्षी वाढते आहे आणि मोठ्या शहरातील मराठी माध्यमाच्या शाळांची संख्या घटते आहे. मराठीचा प्राध्यापक असलेल्या एका मंत्र्याने इयत्ता पहिलीपासून इंग्रजी शिकवण्याचा निर्णय अंमलात आणून इंग्रजीच्या प्रतिष्ठेत भर घालण्याचे पुण्यकर्म केले. शब्दकोश, विश्वकोश अजून पूर्ण झालेले नाहीत. भाषा-आयोग नेमणे, मराठीच्या बोलींची पाहणी, नोंद, दस्तावेजीकरण याची निकड शासनाला अद्याप जाणवलेली नाही. मंत्र्यांपासून महापौरांपर्यंत सर्व पुढारी चित्रवाणीला मुलाखती, मतप्रदर्शन, माहिती देताना मराठीचा आग्रह धरत नाहीत. शासनाने भाषाभिवृद्धीसाठी किती पैसे खर्च केले एवढा एकमेव निकष मराठीचा राजाश्रय सिद्ध करायला पुरेसा आहे का ? मराठीकडे पाहण्याची दृष्टी, मराठीला वागविण्याची तऱ्हा, मराठीसाठी करावयाच्या कामांची तड लावण्याची आच - अशा गोष्टींकडे पाहिले तर मराठीला राजाश्रय आहे यावर विश्वास ठेवणे कठीण आहे.

मग लोकाश्रयाचे काय ? मराठीला पूर्वी असणारा लोकाश्रय आज त्या प्रमाणावर आणि त्या पातळीवरचा आहे का ? खरं पाहाता, राजाश्रयामुळे लोकाश्रयात वाढ व्हायला हवी. त्याची व्याप्ती व खोली वाढायला हवी. भाषेच्या विकासाला वेग यायला हवा. पण मराठीच्या बाबतीत तसे चित्र आज दिसत नाही. मराठीबद्दलचा अतिरिक्त (आणि बऱ्याच वेळा असमंजस) अभिमान वेळोवेळी दिसून आला तरी त्याचे परिवर्तन भक्कम व भरीव कृतीत होत नाही. मराठी माध्यमांच्या शाळांची संख्या व गुणवत्ता वाढण्याऐवजी त्या बंद पडत आहेत आणि इंग्रजी माध्यमाच्या शाळांत आपल्या पाल्यांना प्रवेश मिळावा म्हणून पालक धडपडत आहेत; त्यासाठी देणगी व अव्वाच्या सव्वा शुल्क मोजायची त्यांची तयारी आहे. नऊ-दहा कोटी लोकसंख्या असलेल्या महाराष्ट्रात

मराठी पुस्तकाची पहिली आवृत्ती ५०० प्रतींची असते ! इंग्रजी बोलायला शिकवणाऱ्या खासगी वर्गांच्या जाहिरातींनी वर्तमानपत्रांचे रकाने भरलेले असतात; पण मराठी शिकवणाऱ्या वर्गांची जाहिरात औषधालाही आढळत नाही. मराठी वृत्तपत्रांना इंग्रजी शीर्षकांच्या पुरवण्याच नव्हे तर इंग्रजी वृत्तपत्र सुरू करण्याची आवश्यकता वाटते. ही सगळी लक्षणे मराठीच्या लोकाश्रयाची आहेत असे म्हणता येईल का ?

आज मराठीचा राजाश्रय तोंडदेखला आहे, औपचारिक आहे आणि लोकाश्रय तकलादू आहे. लोकांना हे जाणवते; व्यवहारात त्याचा त्यांना अनुभव येतो. दुकानांवर देवनागरीतील पाट्या लागल्या तरी दुकानांत मराठी बोलले जाईलच असे नाही. मराठीचा विकास व्हायचा असेल राज्यकर्त्यांच्या वृत्तीत व आचरणात मूलभूत फरक व्हायला पाहिजे; मराठीला खऱ्या अर्थाने राजाश्रय मिळायला पाहिजे. तो मिळाला की लोकांच्या दृष्टिकोनात फरक पडायला वेळ लागणार नाही. आणि तसे झाले की लोकाश्रय भक्कम होईल.

मग मराठीच्या विकासाला कुणीही, कसल्याही सीमा घालू शकणार नाही.

■

**प्र. ना. परांजपे**

---

**खुलासा**

'भाषा आणि जीवन'च्या पावसाळा (जुलै) २००८ या अंकातील शेवटच्या परिच्छेदामध्ये मराठी अभ्यास परिषद व 'भाषा आणि जीवन' यांची स्थापनावर्षे अनुक्रमे १९८१ व १९८२ अशी नजरचुकीने पडली आहेत. कृपया, ती अनुक्रमे १९८२ व १९८३ अशी वाचावीत.

**वर्गणीदारांना सूचना**

(१) अनेकवेळा अंक पत्ता बदलल्यामुळे परत येतात. तेव्हा वर्गणीदारांनी बदललेला पत्ता कार्यवाहांना कळविण्याची तसदी घ्यावी.

(२) अंकाविषयी अभिप्राय, सूचना, शंका इत्यादी लिखित स्वरूपात कळविल्यास त्या साऱ्यांचा यथायोग्य विचार करणे सोयीचे जाते. वाचकांकडून प्रतिसादाची अपेक्षा असते.





अनुक्रमणिका

# अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाने

## प्रसृत केलेली शुद्धलेखन-प्रश्नावली

**(द्वारा : मराठवाडा साहित्य परिषद, सन्मित्र कॉलनी, औरंगाबाद ४३१००१)**

(१) महामंडळाचे शुद्धलेखनाचे प्रचलित नियम समाधानकारक आहेत का ? नसल्यास कोणकोणत्या बाबतीत सुधारणा होणे आवश्यक आहे असे आपणांस वाटते ? का ?

(२) ऱ्हस्व, दीर्घ याबद्दल मराठी लेखनात कोणते नियम असावेत असे आपणांस वाटते ?

(३) संस्कृत भाषेतून जसेच्या तसे आलेल्या (तत्सम) शब्दांचे मराठी लेखन करताना कोणती भूमिका घ्यावी असे आपणांस वाटते ?

(४) तत्सम या संज्ञेत केवळ संस्कृतचा अंतर्भाव करावा की अन्य भाषांचाही ?

(५) लेखन उच्चारानुसार असावे असे आपणांस वाटते का ? असल्यास का ? नसल्यास का नाही ?

(६) दंतमूलीय व्यंजने उदा० चमचा, जहाज, झरा आणि तालव्य व्यंजने. उदा० चमत्कार, विजय, झक यासाठी सध्या एकच लेखनचिन्ह वापरले जाते, ही स्थिती बदलावी असे आपणांस वाटते का ? असे असल्यास कोणत्या उच्चारांसाठी कोणती वेगळी चिन्हे आपण सुचवू इच्छिता ?

(७) व्याकरणविषयक घटकांना लेखननियमांत स्थान द्यावे असे आपणांस वाटते का ? (उदा० अनेकवचन, सामान्यरूप, सामासिक शब्द इ०) स्थान देऊ नये असे आपणांस वाटत असल्यास त्याची कारणे कोणती ?

(८) मराठी लेखनाच्या दृष्टीने देवनागरी लिपीत काही बदल ( किंवा सुधारणा ) करणे आपणांस आवश्यक वाटते का ? असल्यास कोणकोणते बदल आपण सुचवू इच्छिता ?

(९) चिह्न - चिन्ह, ब्रह्म - ब्रम्ह, वह्नी - वन्ही, जाह्नवी - जान्हवी यांसारख्या शब्दांचे कोणते लेखन योग्य वाटते ?

(१०) वरील मुद्द्यांखेरीज आपणांस शुद्धलेखन, देवनागरी लिपी इ० बाबतीत काही सुचवायचे आहे काय ?

**कृपया आपल्या सूचना तपशीलवार कळवाव्यात.**

**या संदर्भातील आपली मते महामंडळाकडे पाठवावीत.**

# तीन कविता

राजेश जोशी
भाषांतर : बलवंत जेऊरकर

## दोन ओळींच्या दरम्यान

मी
कवितेच्या दोन ओळींच्या मधली अशी जागा आहे
जी नेहमीच ओसाड दिसत असते

बऱ्याचदा याच ठिकाणी कवीची अदृश्य सावली फिरत असते
मी कवीच्या ब्रह्मांडातील एक गुप्त आकाशगंगा आहे
बऱ्याचदा शब्द इथं येताना नजर चुकवतात
गडबडीत राहून गेलेलं एखादं संयुक्त क्रियापद किंवा एखादा शब्द
कधी-कधी वळचणीला आल्यासारखा एखाद्या कडेला येऊन बसतो
माझ्या परीघातून ड़ोकावतात काही अनुस्वार आणि काही मात्रा
शब्दांमधून चाळत येतात इथं कितीतरी ध्वनी
कधी-कधी तर शब्दांचे काही अर्थ भटकत
येतात इथं
त्या हट्टी मुलासारखे जो फार पूर्वी पळून गेला होता
आपलं घर सोडून

जेवढी दिसते
तेवढी अकंपित, तेवढी निर्विकार जागा नाहीए
मी
बोलता-बोलता अचानक मधेच आलेली स्तब्धता आहे
जिच्यात तरंगत राहतात बोलण्यातले राहून गेलेले तुकडे
कितीतरी चोरवाटा सुरू होतात माझ्या गल्लीतून
ज्या घेऊन जातात



अनुक्रमणिका

सगळ्यांची नजर चुकवून कवीच्या एका अज्ञात दुनियेपर्यंत
अथांगतेच्या या अरण्यात उड्या मारत असतात
कितीतरी अनोळखी सावल्या
शब्दांच्या उंच आडोशाच्या मध्ये मी एक मोकळं आकाश आहे
कवीच्या मनसुब्यांचे गरुड इथं उत्तुंग भरारी घेत असतात
अदृश्याच्या आडोशामागं लपली आहेत काही अशी भुयारं
जी आपल्या गुप्त रस्त्यानं
घेऊन जातात शब्दांच्या जन्मकथेपर्यंत

इथं येण्यापूर्वी चपला बाहेर सोडून ये
तुझ्या पावलांचा आवाज होऊ नये म्हणून
बाहेरचा जरासुद्धा आवाज नष्ट करेल
माझ्या अख्ख्या मायाजालाच्या गारुडाला !

■

## अपूर्ण कविता

अपूर्ण कविता एकटक पाहत राहतात शेवटच्या ओळीनंतर
कागदावर उरलेल्या मोकळ्या जागेकडं

त्यांना आशा असते की कधी ना कधी तरी त्या पूर्ण केल्या जातील
कुठं ना कुठं एखाद्या कवितेमध्ये उपयोगात येतील त्यांच्या ओळी
कित्येक दिवसांपर्यंत त्या अधून-मधून आपली दारं वाजवतात
जणू आठवून देतात की आम्ही इथंच आहोत बरं का आसपास !
आणि कित्येकदा ईर्षेमुळं नवीन कवितांच्या येण्याला सुद्धा थोपवून धरतात

एखादी नवीन ओळ येऊ-येऊ म्हणते
इतक्यात तिला जोरानं धक्का देत येते कुठलीतरी विसरलेली अपूर्ण कविता

अपूर्ण कविता कुरणात हरवलेल्या गायी आहेत ज्या रस्ता शोधत एक दिवस
परत येतात आणि बंद दारापुढं हंबरत राहतात
त्या आपल्या आसपास भटकणारे अतृप्त आत्मे आहेत





अनुक्रमणिका

पण सारखं असंच होतं असं नाही
कधी कधी त्या निमूटपणे पडलेल्या असतात एखाद्या कागदाच्या कोपऱ्यात
कित्येक दिवस, कित्येक महिने आणि कधी-कधीतर आयुष्यभर
त्या आपल्या विस्मृतीच्या पडद्याआड कुठंतरी लपून बसतात
अनेकदा असं होतं की सारखं सारखं बोलवावं लागतं त्यांना
आणि तरीसुद्धा त्या येत नाहीत
अपूर्ण असल्याची जाणीव किंवा अपूर्णतेची घमेंड
त्यांना इतकं हट्टी बनवते
की त्या आपल्या जागेवरून हूं का चूं करत नाहीत

त्या काही बोलत नाहीत पण काहीतरी सांगताहेत असं वाटतं
आम्ही अपूर्णच ठीक आहोत
अशी कुठली कविता आहे जी पूर्णपणे अवतरली आहे धरतीवर
काहीतरी करून काही जोडून काही तोडून त्या पूर्ण होतात किंवा
पूर्ण केल्यासारख्या केल्या जातात कविता
तसं पाहिलं तर जगात अपूर्ण कवितांचीच संख्या जास्त आहे
पूर्ण कवितेत सुद्धा कुठं ना कुठंतरी राहिलेलीच असते एक अपूर्णता

प्रत्येकाला लिहायची असते एक पूर्ण कविता
दुसऱ्या कवीला दुसऱ्या पद्धतीनं
पण गंमत अशी आहे की असं केल्यानं पहिला कवीही समाधानी होत नाही
आणि दुसराही नाही
प्रत्येक कवीला नेहमीच वाटतं की कवितेत कुठंतरी काहीतरी राहून गेलंय
जे असायला पाहिजे होतं... असू शकत होतं...!

■

## आपली भाषा

भाषेतून पुकारण्याच्या आधी ती फक्त एक चिमणी होती
तिला चिमणीसुद्धा आपल्या भाषेनंच म्हटलं
भाषेनंच दिलं त्या झाडाला एक नाव
किंबहुना आपल्या भाषेच्या पलिकडं झाड फक्त झाड होतं

त्याला झाडसुद्धा आपल्या भाषेनंच म्हटलं
अशाच प्रकारे त्या असंख्य नद्या, झरे, पहाड...
कुणालाही माहिती नव्हतं
की आपली भाषा त्यांना कुठल्या नावानं ओळखते

त्यांना आपल्या भाषेशी काही देणं-घेणं नव्हतं
भाषा आपली सोय होती
आपण प्रत्येक गोष्टीला भाषेत रूपांतरित करण्यासाठी उतावीळ होतो
प्रत्येक गोष्टीला घाई-घाईनं भाषेत बसवण्याचा हट्ट
आपल्याला त्या गोष्टींपासून थोडं दूर घेऊन जात होता
कित्येकदा आपल्याला ज्या गोष्टींची नावं माहिती असायची
त्यांचे आकार आपल्याला ठाऊक नसायचे
आपण विचार करायचो की भाषा प्रत्येक गोष्टीला जाणून घ्यायचा दरवाजा आहे
याच तर्काच्या वाटेवरून काही भाषा सत्ताधीश झाल्या
दुबळ्यांची भाषा दुबळी मानून तिचा पराजय व्हायचा
भाषांचे आपापले अहंकार होते

झाडं, दगडं, पक्षी, नद्या, झरे, हवा आणि जनावरांजवळ
त्यांची स्वत:ची अशी भाषा होती की नाही कुणास ठाऊक
पण आपण सातत्यानं त्यांच्यामधून एक भाषा वाचवण्याचा प्रयत्न करायचो
अशाप्रकारे आपले अनुमान त्यांची भाषा घडवत होते
आपण विचार करायचो की आपले अनुमान म्हणजेच सृष्टीची भाषा होय
आपण विचार करायचो की या भाषेनं
आपण वाचून काढू अवघं ब्रह्मांड !

('दो पंक्तियों के बीच' या साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळालेल्या संग्रहातून)

■

303, शांतादुर्गा अपार्टमेंट्स, सरोवर हॉटेलमागे, विश्रामबाग, सांगली 416415
हिंदी विभाग, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली 416415.
भ्रमणभाष : 9850622886








# मराठी प्रमाणभाषेचे लेखननियम

यास्मिन शेख

मराठी प्रमाणभाषेची लेखनपद्धती काय असावी, यासंबंधी इ.स. १८३६पासून अनेक विद्वानांनी आपले विचार मांडले आहेत. याचा अर्थ असा, की लेखनपद्धतीसंबंधी मराठी विचारवंतांत जागरूकता आली ती जवळजवळ १७०-७२ वर्षांपासून. इतकी वर्षे या विषयावर विद्वानांची मतमतान्तरे प्रचलित आहेत. त्या सर्व मतांचा परामर्ष घेण्याचा प्रस्तुत लेखाचा हेतू नाही. एका विद्वानाचा मात्र आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनी त्यांच्या १८६९ साली प्रसिद्ध झालेल्या 'मराठी भाषेची लेखनशुद्धी' या पुस्तकात मराठी लेखनातील अनुच्चारित अनुस्वार वगळावेत, हा त्या वेळच्या रूढ नियमांना धक्का देणारा क्रांतिकारक विचार मांडला होता, हे मला विशेष वाटते.

महाराष्ट्र राज्याची स्थापना १९६०मध्ये झाल्यावर 'मराठी साहित्य महामंडळा'ने आपली लेखनविषयक १४ नियमांची यादी महाराष्ट्र शासनाकडे मान्यतेसाठी पाठवली, ती १९६२मध्ये. १९७२मध्ये त्यात आणखी चार नियमांची भर घालण्यात आली. महाराष्ट्र शासनाने ते नियम मान्य करून मराठी प्रमाणभाषेचे लेखन या नियमांनुसार करावे आणि शिक्षणक्षेत्रात आणि इतरत्रही ते त्वरित अमलात आणावेत, असा आदेश काढला. काही अपवाद वगळता, आपण मराठी माणसे त्या नियमांनुसार मराठीचे लेखन करतो आहोत.

प्रमाणभाषा ही एक संकल्पना (कॉन्सेप्ट) आहे. आपण व्यवहारात मराठीची कोणतीतरी बोली बोलत असतो. लेखन करताना आपण प्रमाणभाषा वापरतो. ही प्रमाणभाषा कोठे वापरली जाते ? शास्त्रीय साहित्यात, नियतकालिकांत, वैचारिक, तात्त्विक लेखनात, औपचारिक पत्रव्यवहारात, पाठ्यपुस्तकांतील ललितेतर पाठांत, इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र, इत्यादी पुस्तकांत, दूरचित्रवाणीवरील बातम्यांच्या किंवा इतर लेखनात, जाहीरनाम्यांत, रस्त्यावरील व इतरत्र लावलेल्या सूचना-फलकांत प्रामुख्याने प्रमाणभाषेचा वापर होतो; निदान तशी अपेक्षा असते. या प्रमाणभाषेच्या लेखनासंबंधी काही नियम करावे लागतात. लेखनात एकवाक्यता असावी, हा

त्यामागचा हेतू असतो.

आपण उच्चारानुसारी लिहितो, असा अनेकांचा गैरसमज असतो. आपण बोलतो, विशेषतः आपली मातृभाषा बोलतो, तेव्हा त्या भाषेचे नियम वेगळे समजून घेण्याची आवश्यकता नसते. कोणतीही भाषा ही नियमबद्धच असते. प्रत्येक भाषेला तिचे नियम असतात, ते त्या भाषेतच अनुस्यूत असतात. आपण अनुकरणाने भाषा बोलायला शिकतो. भाषेचे व्याकरण म्हणजेच भाषेचे नियम आपल्याला कोणी शिकवत नाही, तरी आपण नियमांनुसार बिनचूक बोलतो. बोलताना एखाद्याने चूक केली, तर ती आपण दुरुस्तही करतो. फार तर त्यामागील व्याकरणाचा नियम आपल्याला सांगता येणार नाही, इतकेच. ते नियम शोधून काढावयाचे काम व्याकरणकाराचे असते. हे भाषेचे नियम म्हणजे भाषेचे व्याकरण. व्याकरण हा भाषेचा प्राण आहे. त्यामुळे 'भाषेला व्याकरणातून मुक्त करा' हा विचारच चुकीचा आहे.

मग प्रश्न असा उपस्थित होतो, त्याच भाषेचे लेखन करताना चुका का होतात? लेखनासाठी नियम कशाला हवेत ? याचे उत्तर असे आहे, की बोलणे आणि लिहिणे या दोन भिन्न गोष्टी आहेत. भाषा म्हणजे बोलणे. (भाष् - भाषते = बोलणे), आणि त्याच भाषेचे लेखन ही दोन वेगळी माध्यमे आहेत. भाषा (बोलणे) ही ध्वनींची बनलेली - ध्वनिरूप - आहे, ती श्राव्य आहे; पण तिचे लेखन हे दृश्य, चिन्हांकित, सामाजिक संकेतांनी मान्य केलेले, दुय्यम रूप आहे. बोलणे क्षणभंगुर तर लेखन हे स्थिर स्वरूपाचे असते. भाषा प्रवाही असते. ती सतत, नकळत पण निश्चितपणे हळूहळू बदलत असते. त्या बदलाचे प्रतिबिंब कालान्तराने लेखनात पडत असते. पण लेखनातील स्थिरता आवश्यक असते. भाषा व्यक्तीगणिक थोडी थोडी वेगळी असतेच. 'मी जसं बोलतो, तसंच लिहीन', असा आग्रह प्रत्येकाने धरला, तर लेखन व्यवहारात इतका गोंधळ होईल, की एकाचे लिखाण दुसऱ्याला कळणार नाही. बोलताना आपण 'तल्वार' म्हणतो, पण लिहितो 'तलवार'. 'उपसली' ह्या शब्दाचा उच्चार 'उपस्ली' असा होतो. आपण 'महत्व' म्हणतो, लिहितो 'महत्त्व', आपण 'अक्षरशहा' उच्चारतो, लिहितो 'अक्षरशः' अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. त्यामुळे उच्चारानुसारी लेखन हा विचार मान्य होणार नाही. आणि म्हणूनच कोणत्याही भाषेला लेखनविषयक नियमांची आवश्यकता असते.

या लेखनविषयक नियमांत बदल करावा किंवा नियमांचे सुलभीकरण करावे, अशी हाकाटी सध्या मोठ्या प्रमाणात पिटण्यात येत आहे. (माझी या संदर्भातील भूमिका स्पष्ट करते : प्रचलित नियमांत कोणताही महत्त्वाचा बदल करू नये.) हे नियम सामान्य मराठी माणसाला, शालेय, महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना त्यातील संस्कृतप्रचुर

शब्दयोजनेमुळे चटकन आकलन होत नाहीत; त्या नियमांची अंमलबजावणी करणे त्यामुळे अवघड होते अशी तक्रार केली जाते. मला एक सूचना करावीशी वाटते, ती अशी - या नियमांची सोप्या, सहजपणे आकलन होईल अशा भाषेत मांडणी करता येईल का याचा विचार व्हावा. तसेच, काही नियमांत थोडी भर घालून व अधिक उदाहरणे देऊन जर त्यांची पुनर्मांडणी केली, तर लेखन करणाऱ्याला त्या नियमांचे पालन करणे सुकर होईल. शिवाय, प्रस्तुत नियम मराठीतील सर्व शब्दांना, विशेषत: ज्यांच्या लेखनाबद्दल सामान्य माणसाला निर्णय करता येत नाही अशा शब्दांना, समाविष्ट करून घेत नाहीत, म्हणजेच ते नियम सर्वसमावेशक नाहीत. अशा शब्दांच्या लेखनासाठी या नियमावलीत आणखी काही नियमांची भर घालावी.

याशिवाय, आणखी एक सूचना करते. मराठी वर्णमालेचा या नियमावलीत समावेश करावा व ती सुरुवातीलाच द्यावी. मराठीची जी प्रचलित वर्णमाला आहे, तिच्यात काही बदल सुचवता येतील. १८३६ साली दादोबा - पांडुरंगांनी मराठी व्याकरणाचे पहिले पुस्तक लिहिले, तेव्हा त्यांच्यापुढे आदर्श होता तो संस्कृत व्याकरणाचा. संस्कृत वर्णमाला त्यांनी मराठीसाठी जशीच्या तशी स्वीकारली. तिच्यात आपण आजपर्यंत अगदी थोडेच बदल केले आहेत. तिच्यात आणखी बदल करावेत, असे मला वाटते.

(१) स्वरमालेतून 'ऌ' या स्वराचे उच्चाटन करावे. मराठीत एकमेव शब्द आहे, ज्यात ऌ ह्या स्वराची योजना आढळते. तो शब्द आहे - 'क्लृप्ती'. पण या शब्दाचा उच्चार 'क्लुप्ती' असाच केला जातो. तेव्हा एका शब्दासाठी (आणि तेही उच्चारात नसलेल्या त्यातील स्वरासाठी) 'ऌ' हा स्वर वर्णमालेत ठेवणे योग्य नाही.

(२) मराठी वर्णमालेत अॅ आणि 'ऑ' या दोन स्वरांचा समावेश करावा. या स्वरांचे स्थान 'अ' नंतर 'अॅ' आणि 'आ' नंतर 'ऑ' की 'ए' नंतर 'अॅ' व 'ओ' नंतर 'ऑ' हे भाषाशास्त्रज्ञांनी ठरवावे.

(३) 'अं' आणि 'अ:' हे स्वर नव्हेत; कारण प्रवाहित्व हे स्वरांचे लक्षण त्यांना लागू पडत नाही. त्यांना स्वरमालेतून वगळावे. त्यांचा उल्लेख अनुस्वार किंवा शीर्षबिंदूचे चिन्ह( ं ) आणि विसर्गाचे चिन्ह ( : ) असा करावा. आणि या चिन्हांचे उच्चार स्थानपरत्वे बदलतात हे उदाहरणे देऊन स्पष्ट करावे. जसे,- आंबा - आम्बा, उंट - उण्ट, अक्षरश: (शहा), मन:पूर्वक (न्ह).

(४) मराठीत च्, छ्, ज्, झ् ही व्यंजने तालव्य आहेत. उदा० चार, छत्री, जेवण, झीज. त्याचप्रमाणे च्, ज्, झ् ही व्यंजने दंतमूलीयही आहेत. उदा० चारा, जहाज, झरा. मात्र तालव्य व दंतमूलीय वर्णांना मराठीत वेगळी चिन्हे नाहीत.

(संस्कृतातील वर्णमाला जशीच्या तशी स्वीकारल्यामुळे हे घडले आहे.) अगदी सुरुवातीला छापलेल्या मराठी पुस्तकात दंतमूलीय 'च', 'ज', 'झ' या पद्धतीने त्या व्यंजनावर उभी रेष दिलेली आढळते; पण त्या चिन्हाचे साम्य मात्रेशी असल्यामुळे पुढे ते चिन्ह काढून टाकण्यात आले. दंतमूलीय वर्णाखाली हिंदीप्रमाणे नुक्ता (वर्णाखाली टिंब) द्यावा, असे वाटते. पण त्यात अडचण काय आहे, पाहा -

मराठी मातृभाषा असलेले पुष्कळ सुशिक्षित लोक च़ादर ऐवजी चादर (चारमधील 'चा'चा तालव्य उच्चार), तसेच च़ाबूक ऐवजी चाबूक (तालव्य उच्चार), समाज ऐवजी समाज़ (दंतमूलीय उच्चार) करताना आढळतात. त्या उच्चारांपैकी कोणता उच्चार स्वीकारायचा असा प्रश्न पडतो. दुसरी अडचण, माझ़ा (दंतमूलीय) पण माझी (तालव्य), त्याच़ा (दंतमूलीय) पण त्याची (तालव्य), माज़ (दंतमूलीय) पण माजी (तालव्य). मराठीत 'इ' हा स्वर तालव्य असल्यामुळे 'माझा' यातील 'झा' खाली नुक्ता दिल्यास 'माझी'मधील 'झी' खाली नुक्ता देऊ नये, हे चटकन लक्षात येणे कठीण. ज, झ यांच्या बाबतीतही हीच अडचण येईल. इंग्लिशमध्ये 'S' या अक्षराचा उच्चार वेगवेगळा होतो तो सवयीने आपण बरोबरच करतो. उदा० Some, Sure, Season, thieves. ते उच्चार वेगळे आहेत तेव्हा त्यांचे स्पेलिंग वेगळे हवे, असा अट्टहास कोणी करीत नाही. त्याच पद्धतीने मराठीत एका वर्णाचे दोन उच्चार (किंवा दोन उच्चारांसाठी एक वर्ण) मान्य करायला प्रत्यवाय नसावा.

(५) 'श' आणि 'ष्' या दोन वर्णांचे उच्चार मराठी भाषेत वेगळे होत नाहीत. संस्कृतात श् हा तालव्य आणि ष् हा मूर्धन्य आहे. मराठी बोलण्यात मूर्धन्य उच्चार जवळजवळ लुप्त झाला आहे. पण अनेक तत्सम शब्दांत 'ष्' हे व्यंजन असल्यामुळे तो लेखनात राहू द्यावा. ('ष्' असलेले तत्सम शब्द - विशेष, विषय, विष, षष्ठी इ०) मराठीत अपवादात्मक एखादाच 'ष्' असलेला शब्द दाखवता येईल शोक पण षौक (अर्थ भिन्न आहे.)

(६) अनुस्वारविषयक नियमांत (नियम १ ते ४) काहीही बदल करू नये, असे माझे मत आहे. फार तर सामान्य मराठी माणसाला सुलभ वाटावेत यासाठी ते अधिक सोप्या भाषेत लिहावेत. संसार, सिंह, हंस इ० शब्दांतील अनुस्वाराचा उच्चार सानुनासिकापेक्षा वेगळा होतो, हे कंसात नमूद करावे. (उदा० - संव्सार, हंव्स, इ०)

(७) ऱ्हस्व-दीर्घासंबंधीचे नियम (नियम ५ ते ८). यांत एकच बदल सुचवावासा वाटतो. तत्सम इ-कारान्त व उ-कारान्त शब्द दीर्घ लिहावेत, विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागल्यास ते दीर्घच राहतात; फक्त सामासिक शब्दांत हे शब्द पूर्वपदी आल्यास, ते संस्कृताप्रमाणे ऱ्हस्व लिहावेत, असा नियम आहे. ते शब्द सामासिक

शब्दांत पूर्वपदीही दीर्घ लिहिल्यास या नियमाचे सुलभीकरण होऊ शकेल. संस्कृतची पार्श्वभूमी नसलेल्या व्यक्तीला, हा बदल केल्यामुळे, सामासिक शब्दलेखन करणे अधिक सोयीस्कर होईल. हाच नियम तत्सम इन्-प्रत्ययान्त (विद्यार्थिन्, पक्षिन्) शब्दाच्या बाबतीतही स्वीकारता येईल. जसे : विद्यार्थी - विद्यार्थीगृह, पक्षी - पक्षीमित्र.

(८) नियम ११मध्ये भर घालावी. हळूहळू, मुळूमुळू इ० शब्दांतील दुसरा व चवथा स्वर दीर्घ लिहावा, असा नियम आहे. याला अपवाद ध्वन्यनुसारी शब्दांचा द्यावा. जसे : रुणुझुणु, झुळुझुळु, कुहुकुहु. तसेच, चिवचिव, रिमझिम (उपान्त्य स्वर ऱ्हस्व लिहावा.)

(९) नियम ९ : 'ग्रामनामास पूर लावताना पू दीर्घ लिहावा, असा नियम आहे. उदा० नागपूर, पंढरपूर, सोलापूर. हा नियम वेगळा देण्याचे कारण नव्हते. (ऱ्हस्व-दीर्घविषयक नियमांत याचा अंतर्भाव करता आला असता.) पण जर हा नियम वेगळा द्यायचा असेल, तर या नियमाला पुस्ती जोडावी. या शब्दाचे सामान्यरूप होताना उपान्त्य 'पू' नियमाप्रमाणे ऱ्हस्व होईल; पण विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लावताना शेवटचा अक्षराचे सामान्यरूप होत नसेल, तेव्हा उपान्त्य 'पू' दीर्घच राहील. जसे - नागपूरची (संत्री), पंढरपूरचा (विठोबा), सोलापूरकडे (जाणारा रस्ता), तारापूरमध्ये इ०

नियम १२ : 'ए-कारान्त नामाचे सामान्यरूप या-कारान्त करावे,' हा नियम आहे. उदा० करणे-करण्यासाठी, फडके-फडक्यांना. या नियमात भर घालणे आवश्यक आहे. एकारान्त आडनावाचे सामान्यरूप केले नाही, तरी ते चूक मानू नये. जसे - दामले - दामलेंना, फडकेंचा, इ.

नियम १३ : 'लेखनात पात्राच्या किंवा वक्त्याच्या तोंडी बोलण्याची भाषा घालावी लागते. त्या वेळी तिचे स्वरूप बोलण्यातील उच्चाराप्रमाणे असावे. अन्य प्रसंगी तसे लिहू नये.' हा नियम संदिग्ध आहे. पुरेशी स्पष्टता नसल्यामुळे 'बोलण्यातील उच्चाराप्रमाणे असावे म्हणजे नेमके कसे हे लक्षात येत नाही. खरे पाहता हा नियम, शब्दातील शेवटच्या किंवा उपान्त्य एकाराऐवजी बोलण्यात त्या अक्षरावर जो आघात येतो. (घरे - घरं) म्हणजे शेवटच्या अक्षरातील एकाराऐवजी बोलण्यात जो पूर्णोच्चारित अ येतो, त्यावर शीर्षबिंदू द्यावा, असा हवा. त्या अक्षरावर शीर्षबिंदू दिला नाही, तर त्या शब्दाचा उच्चार 'घर्' (अनेकवचनी) असा होईल. बोलण्यातील अन्त्य वा उपान्त्य (एवढंसं आभाळ) अक्षरातील एकाराऐवजी येणारा 'अ'वरील आघात दाखवण्यासाठी लेखनात त्या अक्षरावर शीर्षबिंदू द्यावा. मात्र शास्त्रीय, वैचारिक, गंभीर लेखनात एकार असू द्यावेत. पण समजा एखाद्या लेखकाने अशा लेखनात 'ए'ऐवजी आघातयुक्त

'अ' (शीर्षबिंदू देऊन) लिहिण्याचे स्वातंत्र्य घेतले तर, ते चूक मानू नये. त्याचप्रमाणे शीर्षबिंदूचा अनुनासिकाशिवाय हा एक वेगळा उपयोग लेखनात होतो, हेही स्पष्ट करावे.

सारांश, मी एकाच नियमात (सामासिक शब्दाच्या लेखनात) बदल सुचवीत आहे. इतर नियमांत भर घालावी, असे सुचवते आहे. शिक्षकांनी हे नियम समजावून घेतले, तर विद्यार्थ्यांना नियम न सांगता नियमांनुसार लिहिण्याची सवय लावता येईल.

शासनाने महामंडळाच्या सहकार्याने तज्ज्ञांची समिती नेमून त्या समितीने घेतलेले निर्णय मान्य करावेत आणि ते सर्वांनी स्वीकारावेत, कारण ती समिती सर्व महत्त्वाची मते विचारात घेऊन योग्य तोच निर्णय घेईल, असा विश्वास वाटतो. ■

विसावा हाइट्स, इमारत क्र. 4, फ्लॅट क्र. 2, डी.पी. रोड, औंध, पुणे 411007.
दूरभाष 020 - 25884472

---

## दोनच पर्यायांची भाषा

आय.टी. म्हणजे बायनरी (द्विपर्यायी). आय.टी.ला समजते ती भाषा फक्त ० आणि १ ची. या भाषेमध्ये एखाद्या गोष्टीचं उत्तर हो किंवा नाही, खरं किंवा खोटं, बरोबर किंवा चूक इतकंच असू शकतं. याच्या मधली दुसरी कोणतीच शक्यता इथे असू शकत नाही. आपल्या प्रत्यक्ष जगण्यामध्ये मात्र हो - नाही, खरं - खोटं, बरोबर - चूक यांच्या सीमारेषेवर असणारं बरंच असतं. किंबहुना सगळंच या सीमारेषेवर असतं.

आय.टी.मध्ये मात्र तसं नाही. उदाहरणच घेऊ या. मायक्रोसॉफ्ट वर्डमध्ये तयार केलेली फाईल सेव्ह करायची असेल, तर तुम्ही की-बोर्ड वापरू शकता किंवा माऊस वापरू शकता. या दोन्हींपैकी एका कोणत्या तरी पर्यायाची व्हॅल्यू १ म्हणजे ट्रू असायलाच हवी. तिसरा पर्यायच इथं नाही. आणि या प्री-प्रोग्रॅम्ड पर्यायांपैकी कोणताही पर्याय निवडला नाही, तर तुम्हांला मिळेल ती मोठ्ठी एरर. हे एक प्रकारचं सपाटीकरणच आहे. सर्वांसाठी सारखेच आणि मर्यादित पर्याय. असं असतं तेव्हा निवडीचं फारसं स्वातंत्र्य राहत नाही हे खरं असलं तरी मर्यादित पर्यायांपैकी एकाची निवड केली, की कामही होतंय असं दिसतं. त्यामुळे मग निवड-स्वातंत्र्य नसल्याची खंतही कमी होते.

दिवसातले जवळजवळ १२ पेक्षा जास्त तास अशाच बायनरी (द्विपर्यायी) विचारात घालवल्यावर या मर्यादित पर्यायांची सवय लागणार नाही तर काय ? म्हणूनच कदाचित एखादी गोष्ट खरेदी करायची असो किंवा निवडणुकीमध्ये मतदान करायचं असो, विचार द्विपर्यायीच होतो. ■

सुचेता कडेठाणकर, साप्ताहिक सकाळ, ५-४-०८

# मराठीचे लेखनसंकेत

**कल्याण काळे**

आपली सध्याची शुद्धलेखनाविषयीची जी चर्चा चालू आहे ती प्रामुख्याने शब्दलेखनचर्चा आहे. गेल्या शंभर वर्षांतली चर्चासुद्धा प्रामुख्याने शब्दलेखनाचीच चर्चा आहे. हल्ली शुद्धलेखनकोश तयार केले जात आहेत; पण ते नेहमी अपूर्णच राहणार आहेत. मराठीसारख्या समृद्ध भाषेची एकूण शब्दसंख्या आज सहज दोनअडीच लाखांच्या घरात जाईल. आणि या शुद्धलेखनकोशांत जास्तीत जास्त वीसएक हजार शब्द आतापर्यंत आले आहेत. त्या कोशांपेक्षा बृहत्कोशातच शब्दांचे शुद्ध रूप का पाहू नये ? अलीकडे तर शब्दांच्या विकृतीसुद्धा शब्दकोशात दाखवल्या जात आहेत. त्यामुळे शुद्धशब्दलेखनकोशांची गरजच आता खरे तर राहिलेली नाही.

दुसरे असे की, शुद्धलेखनचर्चेत फक्त शब्दांच्याच लेखनाबद्दल चर्चा असते. त्यातही ती चर्चा ऱ्हस्व दीर्घ 'उ' आणि 'इ' आणि अनुच्चारित अनुस्वार एवढ्यापुरतीच मर्यादित असते. पण त्यापेक्षा शुद्धलेखनाची चर्चा अधिक व्यापक स्वरूपात झाली पाहिजे. त्यामध्ये अक्षरलेखन, शब्दलेखनाचे संकेत, विकृत शब्दांचे लेखन, व्याकरणाला मान्य असलेली वाक्यरचना, शब्दांचे अर्थ व त्यांचे अचूक प्रयोग, लेखनाच्या विविध शैली इ० सर्व मुद्द्यांचा विचार झाला पाहिजे.

'शुद्धलेखना'साठी 'लेखननियम' असाही एक पर्याय सुचवण्यात आला आहे. मला 'नियम' शब्द वापरावासा वाटत नाही. त्याला आदेशात्मक अर्थ आहे. त्याऐवजी 'लेखनसंकेत' असा पर्याय मी सुचवू इच्छितो. तसे केल्याने शुद्धलेखनाचे सामाजिक अंग स्पष्ट होते. संकेत हे सर्व समाजाने स्वीकारलेले असतात आणि एकदा स्वीकारल्यानंतर ते पाळण्याचे बंधन आपोआपच त्या त्या समाजघटकांवर येते.

हे संकेत समाजमान्य असावे लागतात. त्यात कोणी एखादी दुसरी व्यक्ती बदल करू शकत नाही. पीटर बिक्सेल या जर्मन लेखकाच्या 'ein Tisch ist ein Tisch' ('टेबल म्हणजे टेबल') या कथेचा श्रीमती वर्षा क्षीरसागर यांनी केलेला अनुवाद 'भाषा आणि जीवन'च्या दुसऱ्या वर्षाच्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाला आहे. आपल्या मनाने सर्व भाषायंत्रणेत बदल करून तो वापरू पाहणाऱ्या एका म्हाताऱ्याची शोकांतिका



अनुक्रमणिका

त्या कथेत मोठ्या परिणामकारकतेने सांगितली आहे. सामाजिक संकेत सर्व समाजाने निर्माण केलेले असतात. ते समाजाच्या संमतीनेच बदलता येतात. शुद्धलेखनाच्या बाबतीत शब्दान्ती ऱ्हस्व इकार, उकार दीर्घ करण्याचा संकेत आपण समाजाच्या मान्यतेनेच निर्माण केला. अनुच्चारित अनुस्वार असेच काढून टाकले. समाजाच्या मागणीचा रेटा वाढताच समासान्तर्गत घटकातील ऱ्हस्वान्त इकार, उकार आपल्याला काढावेच लागतील. पण असे संकेत अजिबात नसावेत अशी मागणी अराजक निर्माण करणारी ठरेल.

आपण जसे बोलतो तसेच लिहिले पाहिजे अशी मागणी सध्या केली जात आहे. वस्तुत: बोली-स्वरूपात असलेल्या भाषेच्या लेखनात आपण तसेच लिहितो आहोत. बोलीसाठी लेखनसंकेतांचा आग्रह धरलाच जात नाही, पण प्रमाण भाषेच्या संदर्भात मात्र तसा आग्रह धरला पाहिजे. कारण बोली आणि प्रमाणभाषा यांत मूलत:च फरक आहे. प्रमाणभाषा वापरण्याची क्षेत्रं आणि बोली वापरण्याची क्षेत्रं यात खूप फरक आहे. आपण बोलीभाषेचा वापर अनौपचारिक संभाषणात करतो. आपलं कुटुंब अथवा परिवार यांच्यापुरताच हा अनौपचारिक भाषा व्यवहार मर्यादित असतो. पण प्रमाणभाषा ही प्रामुख्याने लिखित भाषा असते. आपण त्या भाषेत सहसा बोलत नाही. औपचारिक बोलण्यात ती येते. अध्यापन क्षेत्र, न्यायालयीन व्यवहार, कार्यालयीन व्यवहार, वैचारिक लेखन, वृत्तपत्रे, दूरदर्शन, आकाशवाणी यांवरील निवेदने, पाठ्यपुस्तके, सर्व विषयांवरील गंभीर लेखन या सर्व ठिकाणी आपल्याला औपचारिक भाषेतच लिहावे लागते. बोली-वापराच्या क्षेत्रापेक्षा या लिखित औपचारिक क्षेत्राची व्याप्ती कितीतरी अधिक आहे. म्हणून बोलींना मर्यादित संज्ञापनाची भाषा असे म्हणतात. तर प्रमाणभाषेला व्यापक अथवा विस्तारित संज्ञापनाची भाषा असे म्हणतात. भाषेच्या या दोन अंगांची सरमिसळ आपण करता कामा नये. शुद्धलेखनाच्या चर्चांमध्ये अभिनिवेशाने बऱ्याच वेळा अशी गल्लत होत असते.

कोणत्याही एका भाषेच्या क्षेत्रात जेवढे म्हणून सामाजिक गट निर्माण होतात त्या प्रत्येक गटाची एकेक बोली निर्माण होत असते. जात, धर्म, लिंग, वय, शिक्षण, व्यवसाय, इ० अनेक कारणांनी हे गट निर्माण होतात. त्या गटांच्या बोलींना आपण सामाजिक बोली म्हणतो. त्या भाषेच्या विस्तारानुसार तिच्यात प्रादेशिक भेद निर्माण होतात. त्यांना आपण भौगोलिक अथवा प्रादेशिक म्हणून संबोधतो. या अनेक बोली परस्पर संपर्काच्या प्रमाणानुसार कमीअधिक आकलनक्षम असतात. संपर्क जेवढा अधिक तेवढे दोन बोलींतील अंतर कमी आणि संपर्क जसजसा कमी होत जातो तसतसे हे अंतर वाढत जाते. काही बोली तर दुर्बोध होत जातात. पण प्रमाणभाषेचे तसे नाही.

ती या सर्व बोलींशी समान अंतर ठेवून असते. त्यामुळे तिच्यातील लेखन त्या समग्र भाषाक्षेत्राला आकलनक्षम असते. पाठ्यपुस्तके, प्रसारमाध्यमे, न्यायालये, अध्यापनकेंद्रे या सर्व ठिकाणची भाषा सर्वत्र सारखीच असते, असावी लागते. तिच्या बाबतीत सवता-सुभा निर्माण करता येत नाही.

प्रमाणभाषा ही लिखित स्वरूपात जास्त करून असते. बोली या प्रत्यक्षात अनौपचारिक क्षेत्रात बोलल्या जातात. लिखित भाषा आणि बोली यांच्या स्वरूपातच त्यामुळे फरक निर्माण होतो. बोलीतील शब्दसंग्रह आणि प्रमाण भाषेतील संग्रह यात फरक पडतो. व्याकरणाच्या बाबतीतही फरक पडतो. उदा० तो जातो. तो जात आहे. या दोन्हींचा नकार लिखित भाषेत 'तो जात नाही' असाच करतात. पण बोलीत मात्र दुसऱ्या वाक्याचा नकार 'तो जात नाहीए' असा होतो. 'मी जात असे' या रचनेची संपूर्ण रूपावली बोली भाषेत सांगता येत नाही. पण लिखित भाषेत ती सांगता येत असे. आणखी बरेच व्याकरणभेद सांगता येतील. अर्थक्षेत्रही भिन्न होते. आपण बोलीत पल्लेदार वाक्ये वापरू शकत नाही. लिखित भाषेत ती चालू शकतात. सामासिक शब्दांचे प्रमाणही बोलीत कमी असते. आलंकारिक बोलणे बोलीत जास्त प्रमाणात चालत नाही. कायद्याची भाषा तर अगदी काटेतोल असते. सामान्य व्यवहारातील ढिसाळ शब्द तेथे चालत नाहीत. नेमका अर्थ सांगणाऱ्या पारिभाषिक शब्दांचीच तेथे आवश्यकता भासते. मराठीत 'गहाण टाकणे' असे आपण म्हणतो. पण न्यायालयात तेवढ्याने भागत नाही. तेथे हॅपॉथिकेट (Hypothicate), प्लेज (pledge), मॉर्गेज (mortgage) इ० पर्यायांतून निवड करावी लागते. हेच शास्त्रीय लेखनातही अपेक्षित आहे. नेमका अर्थ सांगणारी परिभाषाच तेथे वापरली जाते. या कारणांमुळे प्रमाणभाषा बोलीपेक्षा मूलत:च वेगळी असते.

म्हणून प्रमाणभाषेच्या लेखनपद्धतीत फार मोठी ढवळाढवळ करून चालत नाही. समजा, बोलीत श, ष असा भेद आढळत नाही या कारणाने आपण 'ष' हे अक्षर काढून टाकले तर नवीन पिढीला प्राचीन वाङ्मय वाचताना अडचण येईल. आजच ङ् आणि ञ ही अक्षरे शिक्षणातून वगळली गेली असल्यामुळे 'ङ्' या अक्षराचे 'ड' असं वाचन करणारी अनेक मुलं भेटतात. 'वाङ्मय'चा उच्चार 'वाडमय' असा करणारे अनेक विद्यार्थी मला भेटलेले आहेत. दीर्घ 'रू' आणि ऱ्हस्व 'रु' यातील भेद अनेक मुलांना माहीत नसतो. टंकयंत्रात पूर्वी तो नव्हता, त्याचा हा परिणाम असावा.

अलीकडे तर अक्षरे लिहिण्याची पद्धतही शुद्धलेखनात समाविष्ट करावी अशी गरज मला वाटते आहे. विशिष्ट अक्षरे विशिष्ट क्रमानेच लिहिली पाहिजेत. त्या अक्षराच्या लेखनातील टप्पेच विद्यार्थ्यांना माहीत नसतात. अक्षरांची उंची, त्यांचे टप्पे

या सगळ्यांचे शिक्षण देणारे कित्ते आज बंद झाल्यामुळे विद्यार्थ्यांच्या लेखनात आणि त्या अनुषंगाने वाचनातही दोष निर्माण झाले आहेत. 'स्त्री' हा शब्द 'स्री' असा लिहिला जातो. 'स्रीमुक्ती' असा उच्चार अनेक वेळा ऐकायला मिळतो. 'सहस्त्र', स्त्रोत', असे चुकीचे उच्चार व लेखन मोठमोठे विद्वानही करताना आढळतात. 'बुद्धी, युक्ती, द्वार, आप्त' यांच्याही लेखनात चुकीचा क्रम वापरला जात आहे. जोडाक्षरे लिहिण्यासाठी शासनाच्या आदेशानुसार वापरण्यात येणारी आगगाडी-पद्धतही चुकीची वाटते. त्यामुळे जुने ग्रंथ वाचणे तर कठीण होऊन जाते आणि लेखनसौष्ठवही नाहीसे होते.

संस्कृताचे शिक्षणातून उच्चाटन झाल्यामुळे शुद्धलेखनात चुका होतात अशा तक्रारीत थोडेफार तथ्य असेलही. पण ५०-६० वर्षांपूर्वी चौथीच्या शिष्यवृत्ती परीक्षेला बसणारे विद्यार्थी, 'व्हर्नाक्युलर फायनल' परीक्षा देणारे विद्यार्थी कुठे संस्कृत शिकले होते ? पण त्यांचे शुद्धलेखन निर्दोष असे. कारण प्राथमिक शाळांतून शुद्धलेखन हा शिक्षकांच्या आस्थेचा विषय होता. तसा तो आता राहिलेला नाही. शुद्धलेखनाच्या दुरवस्थेचे तेच एक मुख्य कारण आहे.

आणखी एक मुद्दा इथे स्पष्ट करावासा वाटतो. आपण बोलतो तसे लिहिता आले पाहिजे, अशी काही लोकांची मागणी असते. पण ती अवास्तव आहे. जगात अनेक भाषांना लेखनपद्धती आहेत. पण बोलतो तसे लिहिण्याची व्यवस्था असलेली एकही नैसर्गिक भाषा अस्तित्वात नाही. याचे कारण बोली स्वरूपातील भाषेच्या परिवर्तनाचा वेग आणि लिखित स्वरूपाच्या भाषेतील परिवर्तनाचा वेग यात मूलत:च फरक आहे. लिखित भाषा कमी वेगाने बदलते. त्यामुळे बोली प्रमाणे लेखन असे सूत्र कितीही अमलात आणायचे ठरवले तरी हे अंतर पडणारच. याच कारणामुळे भाषेत 'स्पेलिंग' निर्माण होते. स्पेलिंग म्हणजेच लेखनसंकेत होय. आपण 'तुमचा' असे लिहितो. प्रत्यक्ष उच्चार मात्र 'तुम्चा' असा करतो. 'अ'कारान्त शब्द लिहिण्यासाठी अनुस्वाराचा वापर, च, ज़ यांच्यासाठी एकाच अक्षराचा वापर आपण सर्रास करतो. याचाच अर्थ मराठीतही स्पेलिंग असते. ही गोष्ट आपण लक्षात ठेवायची असते. 'ऋषी' शब्दाचा उच्चार कसाही करा पण लेखन मात्र तसेच केले पाहिजे. ■

ए-5, प्रज्ञानगड, नवश्या मारुती गल्ली, वीटभट्टी, सिंहगड रस्ता, पुणे 411 030.
दूरभाष 020 - 24253136

**महत्त्वाची सूचना :**
'भाषा आणि जीवन'च्या वार्षिक वर्गणीदारांनी नव्या वर्षाची वर्गणी पाठवावी. वर्गणीचे तपशील आवरणपृष्ठ 'दोन'वर आहेत.





अनुक्रमणिका

# आगर बोली

शंकर सखाराम

दर्यावरचा कोळी, आगरातला आगरकर-आगरी, माळातला माळी आणि रानातला आदिवासी अशा भौगोलिकदृष्ट्या कोकणातल्या आगरातील वसाहती. आगर म्हणजे भात, मीठ, नारळ, सुपारी, भाजीपाला, फळे व मासे संवर्धन करण्याची जागा. असे आगर पिकविणारा तो आगरकर-आगरी. ह्या आगरी समाजाची वस्ती रायगड (पूर्वीचा कुलाबा), ठाणे ह्या जिल्ह्यांमध्ये मोठ्या प्रमाणात आहे. कोकण सोडून धुळे, जळगाव-पासून गुजरातपर्यंत ती तुरळक प्रमाणात आहे. ह्या समाजाची बोली ती आगरी बोली असे ह्या बोलीचे नामकरण करता येईल; परंतु आगरी ही एक जात समजली जाते; तेव्हा अशी जातीची बोली-आगरी बोली म्हणणे संकुचितपणाचे आहे. शिवाय ही बोली हाच समाज बोलतो असे नाही, तर आगरातील बलुतेदार, आदिवासी यांच्याबरोबर दुकानदार-मारवाडीही प्रसंगपरत्वे ही बोली बोलतात. शिवाय कोळी, माळी हे समाज जवळ असल्याने त्या बोलींची मिश्रता ह्या बोलीत आहे. तेव्हा सर्वसमावेशक दृष्ट्या ह्या बोलीस आगरातील बोली - 'आगर बोली' म्हणजे संयुक्तिक वाटते.

ही आगर बोली समुद्राकाठची असल्याने हीत उच्चार-स्पष्टता हवी तशी नाही. विरार-वसईकडे ही बरीचशी सानुनासिक आहे. तर अलिबागकडे तशी स्पष्ट आहे. ही बोली जवळजवळ प्रत्येक गावानुसार थोडीशी बदलते. मुंबईतील हा मूळ समाज ही बोली विसरला आहे, तर नवी मुंबईतील ही बोली कोळी बोली मिश्रित अशी आहे. वसई-पालघरकडे ही बोली वाडवळ, भंडारी बोली मिश्रित अशी येते.

आगरी समाजाचे पूर्वी (१) शुद्ध आगरी, (२) दस आगरी व (३) वरप आगरी असे पोटजातीत वर्गीकरण होत होते. शुद्ध आगरीत मीठ आगरी, जस आगरी व ढोल आगरी असे उपपोट प्रकार होते. आज मात्र असे प्रकार मानले जात नाहीत. खुद्द मुंबाआईच्या मुंबईत चौदा पाटील, बारा पाटील, आगळे आगरी असे स्तर मानले जात; तेही आता मानले जात नाहीत.

आगर बोलीचे प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे 'ळ'च्या ऐवजी 'ल' व 'ण'च्या ऐवजी 'न' जसे सकाळ-सकाल, पळव-पलव; कोण-कोन, बाण-बान, वळण-वलन.

ह्या बोलीची रूपे व काही शब्द महानुभाव पंथीय व भागवतधर्मीय ग्रंथलेखनात दिसून येतात. विशेषत: लीळाचरित्र, दृष्टांतपाठ व ज्ञानेश्वरीत ते जास्त प्रमाणात दिसतात. आगरात लोकगीते व लोककथा यांचा भरणा जास्त आहे. ही लोकसंपदा म्हाताऱ्या आजीकडून - डोकऱ्यांकडून ऐकायला कर्णमधुर वाटते.

गाय बा चऱ्हतं भीमा तीरी गो,
भीमा तीऽऽरी
गायला राखीत किस्न हरी गो,
किस्न हऽऽरी
काय बा वर्नू गायची शेपू गो,
गायची शेऽऽपू,
जशी नांगीन घेतं झेपू गो,
नांगीन घेतं झेऽऽपू
काय बा वर्नू गायच्या मांड्या गो,
गायच्या मांऽऽड्या
जशी पालुखीच्या दांड्या गो
पालुखीच्या दांऽऽड्या -

इथे तेराव्या शतकातील प्राकृत बोलीतील शेपू, नाकू, कानू अशी रूपे साकारलेली दिसतात.

आगर बोलीत लोककथा अमाप आहेत. ह्या लोककथा सांगताना अलिबागच्या आगरात नेहमी गोष्टींच्या ओनाम्याला येते ती तीन भांवडांची गोष्ट-

**अकामकची गोष्ट**

यक व्हता अका, यक व्हता मका. आन त्या दोघांची यक बह्यनीस व्हती हिजू. त अका, मका आन हिजू गेली खारीन, झोलाला. अकला मिलला निवटा, मकला मिलला खरबा आन हिजूला मिलली कोलबी. तिघाजना आली घरा. अकनी निवटा टाकला चुलीन भुजत, मकनी खरबा आन हिजूनी कोलबी टाकली भुजत. न तिघाजना गेली नदीवर आंग धवला. तिघाजना आंग धऊनशी आली, त हिजूची कोलबी करापली ! मंग अकनी दिला डोचूक, मकनी दिला शेपूट आन हिजूचा जवान केला चालता. अशी तिघाजना जवली.

(यक-एक, व्हता-होता, खारीन-खाडीत, झोलाला-मासे पकडायला, निवटा (खरबा, कोलबी) - मासळीचे प्रकार, चुलीन-चुलीत, भुजत-भाजत, आंग धवाला-

आंघोळीला, करापली - करपली, डोचूक - डोके, जवान - जेवण.)[१]

**<u>कावला - चिरीची गोष्ट</u>**

यकदा कावला आन चिरीनी केली भागीन भातशेती. यलवर पाऊस परला, आगोठ लागली. कावलनी धरला नांगर, चिरीनी केली भातपहिरनी. यलवर लावनी केली. चांगला पाऊस झाला. मस्त मशागत केली. जाम पीक आला. दोघाही मिलून लानी केली, भांदनी केली. मातर कावलनी यकटनीच मलनी काऱ्हली आन भाताच्या भरल्या बारीक गोनी, पलजीच्या भरल्या म्होट्या म्होट्या गोनी. आन चिरीला बोलला, 'चिरबाय, तुल्हा या म्होट्या गोनी घे, मना बारक्या गोनी दे.' चिरीनी गोनी हालवून बघितल्या. ती कावलचा कावा समाजली. ती बोलली, 'कावलंदादा, माझा बारका जीव मना बारक्या गोनी दे, तू म्होटा तुला म्होट्या गोनी घे.' पन कावला काय ऐकना. शेवटी परकरन गेला न्यायाधीसाकरं. त्यांनी केला न्याय आन चिरीला तिचा हिस्सा-वाटा मिलवून दिला. चिरी बोलली, 'कावलंदादा, तुझी आथा वाट यगली. तू तुझे वाटन जा, मी माझे वाटन.'

दृष्टांतपाठात शोभाव्या अशा कितीतरी लोककथा आगर बोलीत आहेत. अशी बोली ऐकताना ह्या बोलीची काही वैशिष्ट्ये नोंदता येतील -

(१) 'ळ'बद्दल 'ल' : कंटाळा-कंटाला, नळ-नल, धूळ-धूल.
(२) 'ण'बद्दल 'न' : आठवण-आठवन, पण-पन, गोण-गोन.
(३) शद्बारंभी येणारा 'ड' तसाच राहतो मात्र नंतरच्या 'ड' चा 'र' होतो : डबा-डबा, डसा; कडू-करू, वेडा-यरा, तडांग-तरांग.
(४) शब्दान्ती येणारा ओकार ऊकार होतो : गेलो-गेलू, आलो-आलू.
(५) ओकारान्त शब्द अकारान्त होऊन पुढे 'स' येतो : घेतो-घेतस, मारतो - मारतस, करतस, जातस इ०
(६) शब्दान्ती 'त' ऐवजी 'व' येतो : घेतलात-घेतलाव, बघितलेत-बघितलाव, केलाव, तोरलाव इ०
(७) शब्दान्ती 'ए'चा दीर्घ 'अ' होतो. : कुठे-कुठं, तिथे-तिथं, इथं.
(८) अनेकवचनी नामाच्या अन्ती 'ए'चा 'आ' होतो : झाडे-झारा, पोरे-पोरा, लाकडा शेता.
(९) अनुस्वार स्पष्ट उच्चारला जात नाही : आंबा-आऽबा, चिंच-चिऽच, रंग-रऽग, हंडा-हाऽडा, पिंपळ-पिपल, खुंट-खूट.

[१] अधिक माहितीसाठी पहा - 'शब्दानुबंध' - शंकर सखाराम, मॅजेस्टिक प्रकाशन पा

(१०) छ चा सर्रास स होतो : छत्री-सत्री, छोटा-सोटा, छोकरा-सोकरा, छगन-सगन, छडी-सरी.

(११) शब्दान्ती कठोर व्यंजन येऊन तत्पूर्वी व आला तर व चा अर्धा व होऊन त्यापुढे महाप्राण येऊन अन्तीच्या कठोर व्यंजनाचा र होतो : केवढा-कव्हरा, तेवढा-त्यव्हरा, जेवढा-जव्हरा.

(१२) शब्दारंभी र चा कधी ल होतो : रडतोय-लरतय, रबर-लबर,

(१३) संयुक्त व्यंजनातील र वेगळा उच्चारला जातो : प्रकाश-परकास, मात्र-मातर, कात्री-कातर, श्रीमंत-शीरीमंत.

(१४) श चा स होतो : शरद-सरद, शाप-सराप, शोध-सोद.

(१५) शब्दारंभीचा वि जाऊन त्याजागी इ येतो : विमान-इमान, विमल-इमल, विषय-इषय, विरजण-इरजन.

(१६) पण (सुद्धा या अर्थी) ऐवजी पन किंवा बी येते : मीपण-मीपन/बी, तू पण-तूपन/बी

(१७) ऊन, हून प्रत्ययाऐवजी शी येतो : गर्दीतून-गर्दीशी, गावातून-गावानशी, लांबून-लांबशी, गावाहून-गावशी.

(१८) 'ला' या प्रत्ययाऐवजी ल्हा येतो : तुला-तुल्हा, तिला-तिल्हा. मात्र मलाचे मना होते.

(१९) 'त' या प्रत्ययाऐवजी न येतो : फुलात-फुलान, रानात-रानान, मनात-मनान.

(२०) नो (संबोधन) ऐवजी नू किंवा हू येतो : पोरांनो-पोरांनू/पोरांहू. गाववाल्यांनो - गाववाल्यांनू/हू.

(२१) 'प्रमाणे' ऐवजी सारा/सारी येते : त्याप्रमाणे-त्या सारा/री, मुलाप्रमाणे-मुलासारा, साखरेप्रमाणे-साकरंसारा.

(२२) 'होता', 'नव्हता' ऐवजी 'व्हता', 'नता' येते.

(२३) 'आता'चे 'आथा' होते : आथा कल्हा लरतस ?

(२४) 'अ'चा सर्रास 'आ' होतो : अंग-आंऽग, अंतर-आंतर, असा-आसा.

(२५) कशालाचे कन्हाला किंवा कल्हा होते - कन्हाला आलास ?

(२६) शब्दारंभी 'वे' ऐवजी 'य' येतो : वेडा-यरा, वेस-यस, वेगळा-यगला, वेद-यद, वेसण-यसन.

(२७) शब्दारंभी 'म'ऐवजी 'म्हा' येतो : महादेव-म्हादेव, मोठा-म्होटा, मारुती-म्हारोती, महाराज-म्हाराज.

(२८) 'ढ' ऐवजी 'ऱ्ह' येतो : गाढव-गाऱ्हव, पेढा-पेऱ्हा, कढी-कऱ्ही.

(२९) शब्दारंभी 'ओ' ऐवजी 'व' येतो : ओटा-वटा, ओवा-ववा, ओकारी-वकारी, ओल-वल.

(३०) शब्दारंभी 'ए' ऐवजी 'य' येतो : एक-यक, एकदा-यकदा, एकर-यकर.

(३१) शब्दान्ती ई ऐवजी य येतो : सुई-सुय, रुखमाई-रुखमाय, आई-आय, घाई-घाय, जावई-जावय.

(३२) शब्दारंभी व्यंजन+ऐ च्या ऐवजी व्यंजन+अ आणि नंतर लगेच 'ई' असा बदल होतो : बैल-बईल, म्हैस-म्हईस, वैद्य-वईद, मैल-मईल, खैर-खईर, सैल-सईल,

(३३) शब्दारंभी व्यंजन+औ च्या ऐवजी व्यंजन+अ आणि नंतर लगेच 'ऊ' असा बदल होतो : मौज-मऊज, गौर-गऊर, फौज-फऊज, हौद-हऊद, कौल-कऊल,

अशी ही उत्तर कोकणची आगर बोली मराठी सारस्वतात लेखनात न आल्याने फारशी रुळली नाही. पण तशी ही समजण्यास कठीण मात्र नाही. माझ्या कथा, कादंबरी व ललित लेखनातून ही प्रथमच मोठ्या प्रमाणात आली आहे. बरोबरच आदिवासी - कातकरी, कोळी, माळी, कोकणी मुसलमानी, याही कोकणी बोली माझ्या अनेक पुस्तकांतून आल्या आहेत. जिज्ञासूंनी 'एसईझेड', 'घरपरसू', 'गावदरणी', 'कोसलन', 'आगरातली माणसं', 'बलुतेदार', 'शब्दानुबंध' वगैरे पुस्तके पाहिली तर ह्या बोलींचा परिचय होईल. ■

'तुलसी निवास', ए-202, विजया बँकेजवळ, सेक्टर 19, कोपरखैरणे, नवी मुंबई 400709.
दूरभाष : (9522) 27545531

**सामाजिक द्रोह**

लोकभाषा आणि राजभाषा असलेल्या स्वभाषेचा वापर न करणे किंवा वापर टाळणे हा सामाजिक द्रोह आहे, याची जाणीव अनेकांना नसते. विरोधाभासात्मक वाटेल, पण भाषानिवडीचे अनिर्बंध स्वातंत्र्य हे समाजाला अंतिमत: एकभाषी आणि बहुधा परभाषी समाजाकडे घेऊन जाते. आपल्या देशात आणि महाराष्ट्रात, विशेषत: मुंबईसारख्या महानगरीमध्ये ही प्रक्रिया सुरू झालेली आहे. स्वभाषेच्या सक्षमीकरणाचे आव्हान न स्वीकारता स्वत:चे आर्थिक सक्षमीकरण करून घेण्यासाठी आधी अभिजन व बुद्धिजीवी वर्गाने आणि आता बहुजन समाजानेही इंग्रजी या परकीय सक्षम भाषेचा स्वीकार करायला सुरुवात केली आहे.

डॉ. प्रकाश परब, 'भाषा, समाज आणि शासन' ,
'महाराष्ट्र टाइम्स' (मुंबई) ११-०९-२००८

# धनगरी ओव्यांचा लोकतत्त्वीय अभ्यास

माधुरी वि. दाणी

लोकसाहित्यात पारंपरिक, सामाजिक, सांस्कृतिक जीवन प्रगट होत असते. समाजात रूढ असणाऱ्या समजुती, भ्रम, मंत्र-तंत्र, लोकरूढी, उत्सव यांचे दर्शन घडत असते. कधी लोकगीतांत, लोककथांत यक्ष, गंधर्व, किन्नर अशा अतिमानवी व्यक्तींचे उल्लेख आढळतात, तर कधी राक्षस, भूत, हडळ, जादूटोणा, प्राणिकथा अशा लोकतत्त्वीय घटकांचा मुक्त आविष्कार आढळतो. समाजात रूढ असणारे विधी, आचार-विचार, शुभ-अशुभाच्या कल्पना, शकून-अपशकुनाच्या कल्पनाही विखुरलेल्या असतात. ज्या समाजात, ज्या काळात ते लोकसाहित्य निर्माण झालेले असते, त्या समाजाचे दर्शन लोकसाहित्यातून घडते. त्या विशिष्ट समाजात रूढ असणाऱ्या प्रथा, समजुती, रूढी-परंपरा त्यातून प्रगट होतात.

प्रस्तुत लेखात धनगरी ओव्यांचा लोकतत्त्वीय अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे.

धनगर समाज पूर्वी भटक्या अवस्थेत होता. आता तो बऱ्याच अंशी स्थिरावला आहे. या धनगर समाजाबद्दल डॉ. सरोजिनी बाबर यांनी उत्पत्तीकथा नमूद केली आहे. एकदा मेंढ्यांचे व शेळ्यांचे कळप वारुळातून निघाले. हे कळप शेताची नासाडी करू लागले. तेव्हा लोकांनी महादेवाची प्रार्थना केली. महादेवाने मेंढरांच्या राखणीसाठी धनगर लोक निर्माण केले.

धनगर लोक बिरोबाचे उपासक आहेत. माळावर, गावाबाहेर बिरोबाचे मंदिर असते. बिरोबाचीही जन्मकथा सांगितली जाते. ही कथा अशी : एका कुणब्याला शेत नांगरताना एक मुलगी मिळाली. कुणब्याने ती मुलगी राजाला दिली. तिचे नाव गंगासुरावंती. गंगासुरावंती वयात आल्यावर राजा तिच्यासाठी वर शोधू लागला; पण गंगासुरावंतीला कौमार्यच हवे होते. पुरुष सहवासाचा तिला तिटकारा होता. म्हणून ती लग्नाला नकार देत राहिली. पण एकदा गायीचा पान्हा पिणारे वासरू तिने पाहिले, त्यामुळे तिच्या मनात वत्सलभाव जागृत झाला. तिला मातृत्व हवेसे वाटू लागले; पण तिला पुरुषाच्या सहवासाशिवाय आई व्हायचे होते. त्यासाठी तिने तप आरंभले.

'बिनमेघाचे धान्य दे. बिनफुलाचे फळ दे आणि बिनभोगाचा पुत्र दे.' अशी प्रार्थना केली. तिला शंकरपार्वती प्रसन्न झाले. त्यांनी तिला बिनमेघाचे धान्य दिले. त्या धान्याच्या भाकरीत शंकराने प्रवेश केला. ती भाकरी तिने खाल्ली व ती गर्भवती राहिली. यथावकाश गंगासुरावंतीला पुत्र झाला, तोच बिरोबा ! धनगरांचे दैवत !

बहुतेक सर्व देवतांचा जन्म असा सामान्यांहून वेगळा, वैशिष्ट्यपूर्ण आहे, असे आढळते. हे लोकतत्त्व आहे. दशरथाने पुत्रकामेष्टी यज्ञ केल्यानंतर रामजन्म झाला. सीता ही भूमिकन्या आहे. द्रौपदीही 'याज्ञसेनी' आहे. ती यज्ञातून निर्माण झाली. महानुभाव पंथाचे प्रवर्तक श्री चक्रधर स्वामींच्या अवताराची कथाही अशीच अद्‌भुत आहे. देव-दैवतांच्या जन्माचे हे लोकतत्त्व अन्य धर्मांतही आढळते.

कोजागिरी पौर्णिमेला बिरोबाची यात्रा भरते. भल्यामोठ्या ढोलाच्या तालावर रात्रभर गीते म्हटली जातात. देवाचे सुंबरान मांडतात. सुंबरान महणजे स्मरण.

'सुंबरान मांडिलं गा सुंबरान मांडिलं ।
आदि नमन गणाला । पतिव्रता पार्वतीला ।
कैलाशीच्या महादेवाला । काशीलिंग बिरोबाला ॥

अशा गीताने यात्रा सुरू होते.

कोणत्याही कार्यक्रमाची सुरुवात गणपतीच्या नमनाने करायची प्रथा लोकमानसात रुजलेली आहे. मग तो कार्यक्रम विवाह, वास्तुशांत यासारखा धार्मिक असेल किंवा संतांनी - पंडितांनी लिहिलेला एखादा ग्रंथ असेल. कोणत्याही पूजेत सुपारीचा गणपती पुजला जातो. 'ॐ नमोजी आद्या' म्हणत ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीची सुरुवात करतात. धनगरांचे सुंबरानही याला अपवाद नाही.

महादेव कैलास पर्वतावर राहतो ही सुद्धा लोकमानसाची श्रद्धा आहे. 'रामायण', 'महाभारत' या ग्रंथांत, पुराणात कैलास पर्वताचा उल्लेख आहे. दासबोधातही कैलासाचा उल्लेख आढळतो.

ब्रह्मशृंग तो पर्वताचा । विष्णुशृंग तो मर्गजाचा ।
शिवशृंग तो स्फटिकाचा । कैलास नाम त्याचे ॥
(द. ४, स. १०, ओ. १२)

म्हणजे ब्रह्मदेवाचा सत्यलोक सोन्याचा आहे. विष्णूचा वैकुंठलोक पाचूचा आहे व शंकराचा कैलास स्फटिकाचा आहे. वर उल्लेख केलेल्या धनगरी गीतातही हेच लोकतत्त्व आढळते.

त्याचप्रमाणे बिरोबा हा शंकराचा अवतार आहे अशी धनगर समाजाची श्रद्धा आहे. गंगासुरावंतीला दिलेल्या भाकरीत शंकराने प्रवेश केला होता. म्हणून काशीलिंग

बिरोबा असा उल्लेख वरील गीतात आढळतो.

देव बहुतांशवेळी डोंगरावर राहतो. त्याच्या दर्शनाची वाट चढाची, काट्याकुट्याची अवघड असते. भक्ताला त्याचे दर्शन सहजासहजी होत नाही असा सार्वत्रिक अनुभव आहे. तिरुपती बालाजीच्या दर्शनाला डोंगर चढावा लागतो. पंढरीच्या विठोबाच्या दर्शनासाठी लाखो भक्त आळंदी ते पंढरपूर ही वाट पायी तुडवतात. शंकराची अनेक मंदिरे उंच डोंगरावरच आहेत.

हाच अनुभव धनगर स्त्रीलाही येतो. ही स्त्री म्हणते :

'देव बीराजीला जाती, माझ्या पायाला आलं फोडं ।
देव बीराजीचं मला बाई लई याडं ।'

'देव बीराजीला जाती, खडं टोचलं माझ्या पाया ।
देव बीराजी, माझी येऊ दे तुला दया ।'

'आता नवस बोलली जीवापरीस अवघड
देवा माझ्या बीरयाजी, राहाणं तुजं काटवाण ।'

बीरदेव माळावर, काट्याकुट्यात राहतो, काटवणात राहतो. त्याच्या दर्शनाला जाताना खडे टोचतात. पायाला फोड येतात. तरीही तिला दर्शनाला जायचंच आहे; कारण बीराजीरायाचं वेड तिला लागले आहे.

'नवस बोलणे' हाही एक लोकाचार आहे. आपल्या मनातील इच्छित पूर्ण व्हावे यासाठी नवस बोलला जातो. कधी देवाला कौल लावला जातो. विचारलेल्या प्रश्नाला मिळणारे दैवी उत्तर 'कौल' या नावाने ओळखले जाते. कौल लावण्याची प्रथा जागतिक आहे. इजिप्शियन, ग्रीक, रोमन लोकही कौलावर विश्वास ठेवत असत. महाराष्ट्रातही सर्वत्र कौल लावण्याची प्रथा आहे. धनगर स्त्रीही बिरोबाला कौल लावते. हे लोकतत्त्व आहे.

'बीरयाच्या देवळात मी ग कवाची उभी ऱ्हाऊ ।
देव माझा बीरयाजी, आधी कवल माझा लाऊ ।'

धनगरी ओव्यांमध्ये कौलाचा उल्लेख आढळतो, तसाच 'कंदुरी'चा उल्लेखही आढळतो.

'अगं नवस बोलली पीरसाहिबा कंदुरी ।
असं पोटीचं माझ्या बाळ, खेळू दे मंदिरी ।'

'कंदुरी' ही एक लोकप्रथा आहे. देवाला, विशेषत: पीराला नवस बोलला जातो. रोगमुक्तीसाठी किंवा संतती व्हावी म्हणून पीराला नवस बोलण्याचा प्रघात आहे. आपली इच्छा पूर्ण झाल्यानंतर 'कंदुरी' केली जाते. उत्सवाच्या दिवशी पीरासमोर

बकरं मारून त्याच्या मांसाचे जेवण केले जाते. ही प्रथा महाराष्ट्रात आजही अनेक ठिकाणी सुरू आहे.

नवस बोलणे, कौल लावणे, कंदुरी या सर्व धर्म-कल्पनांचा पगडा केवळ आदिम पातळीवरच होता असे नाही. तर आजच्या विज्ञानयुगातही या धर्मकल्पनांचा पगडा शिक्षित-अशिक्षित सर्वांवर आढळून येतो. धनगर स्त्रीचीही मानसिकता तशीच आहे यात नवल नाही.

यात्वात्मकता ही भारतीयांची धर्मश्रद्धा आहे. भूत, पिशाच्च, झाड इत्यादी अतिमानवी शक्ती अस्तित्वात आहेत असा बहुतांश लोकांचा समज आहे. या अतिमानवी व्यक्तींना संतुष्ट करणे किंवा त्यांच्यापासून संरक्षण करणे यासाठी मंत्र-तंत्राचा वापर मानव अनेक शतके करत आहे. ताईत भुताखेतांपासून संरक्षण करतो, रोगांचे वा इतर संकटांचे निवारण करतो अशी लोकश्रद्धा आहे. लहान मुलांना दृष्ट लागू नये, देवीच्या साथीपासून त्यांचे रक्षण व्हावे हा हेतूही ताईत बांधण्यामागे असतो. कधी शीतळादेवीची प्रतिमा ताईतामध्ये असते, कधी वाघाचे केस, नखे, कधी महंमद पैगंबरांची कुराणातील वचने लिहिलेला कागद ताईतामध्ये ठेवला जातो.

धनगर स्त्री ताईत बांधण्याच्या प्रथेवर श्रद्धा ठेवते. आपल्या बाळाला दृष्ट लागू नये म्हणून स्वत: पीरसाहेब त्याला ताईत भरून देतो असे तिला वाटते. ती म्हणते,

'माझा लाडका राघू सर्व्या देवाला म्हाईत,
पीरसाहेब बीराजी देतो भरून ताईत ।'

भंडारा उधळणे ही सुद्धा एक सामाजिक प्रथा आहे. धनगर समाज कोजागिरी पौर्णिमेला, यात्रे-जत्रेच्या दिवशी भंडारा उधळतो. त्याचे चित्रणही धनगरी ओवीत दिसते.

'दसऱ्याच्या महिन्यात हळदीबाईला भाव आला ।
हळदीबाईला भाव आला, देव बीराजी नवरा झाला ।'

'दसऱ्याच्या महिन्यामंदी गजी नाचून आलं घाया ।
तान्ह्या बाळा किती सांगू, लाव भंडारा पड पाया ।'

धनगर समाजाचे 'गजी' हे लोकनृत्य आहे. कोजागिरी पौर्णिमेला तरुण धनगर गजी नाचतात. नाचून नाचून दमतात. दमलेल्या गजींचा तिला अभिमान वाटतो.

भारतीय मानसिकता साधू-सिद्धांच्या प्रभावाखाली नांदत आली आहे. लोकमानसावर आजही सिद्धांचा प्रभाव आहे. बीरोबाच्या मंदिराशेजारी दावणमलिकाची समाधी आहे. ही समाधी पीराची आहे, तो मुस्लीम आहे याचा विचार धनगर वा हिंदू करत नाहीत. हिंदूंच्या सर्व जाती या पीराची पूजा करतात. समाधीवर बुक्का

वाहतात, फुले वाहतात. त्याला केशरी गंधही लावतात आणि पीरावर हिरवा गलबही घालतात. लोकमानस धर्मांधता जाणत नाही. सिद्धपुरुषांचा प्रभाव, मग ते कोणत्याही धर्माचे असोत, लोकमानसावर बिंबलेला आहे. संतान व्हावे म्हणून या पीराला नवस बोलतात. हा पीर धनगर समाजाच्या लोकश्रद्धेचा विषय बनला आहे.

धनगर समाजाच्या मानसात असे सिद्ध पुरुष, गजीनृत्य, भंडारा उधळणे, नवस बोलणे, ताईत बांधणे, कंदुरी, बीरदेवाची अद्‌भुत जन्मकथा अशा लोकतत्त्वीय धारणांना अढळ स्थान आहे. या एकविसाव्या शतकातही त्यांना आदिम जीवनाची ओढ आहे, परंपरेचा प्रभाव त्यांच्या मनावर आहे.

या सर्व लोकतत्त्वीय धारणा म्हणूनच त्यांच्या गीतांमध्ये दिसतात. ■

4, बुधवार पेठ, फलटण 415523, जि. सातारा.
दूरभाष : 02166-222120. भ्रमणभाष : 9421208595

---

## सपाटीकरणाची सुरुवात

आय.टी.चं क्षेत्र इथं रुजलं, तशी एकमेकांना केवळ नावानं हात मारायची पद्धत रूढ झाली. पारंपरिक क्षेत्रांना सरावलेल्या आपल्याला सुरवातीला आपल्या मॅनेजरला, इतकंच काय आपल्या कंपनीच्या प्रेसिडेंटलादेखील त्याच्या नावानं हाक मारण्याची कल्पना जड गेली. कामाच्या अमेरिकन संस्कृतीचा एक भाग म्हणून रुजवली गेलेली ही पद्धत खरं म्हणजे सपाटीकरणाचा एक अविभाज्य आणि मूलभूत घटक बनून गेली आहे. जगाच्या त्या कोपऱ्यात वेगळ्याच अक्षांश-रेखांशावर राहणारा कोणी आपला सहकारी. त्याच्याशी बोलताना जेव्हा Good Morning Mr. Mike वरून Hey Mike अशी भाषा येऊ लागली, तेव्हा आपण त्याच्यापेक्षा काही वेगळे नसल्याची भावना निर्माण होणं साहजिक होतं. समुद्रापलीकडे राहणाऱ्या त्या लोकांबद्दल वाटणारं अप्रूप, वाटणारी भीती या अशा प्रकारच्या अनौपचारिक संवादांमधून हळूहळू गळून पडली. एकेरीमध्ये संवाद होऊ लागल्यामुळे आपण सर्वच जण समान पातळीवर असल्याची भावना निर्माण झाली. इतकंच नाही तर लातूरचा सोपान, मुंबईचा राहूल, पुण्याची रचना, दिल्लीचा राजीव, चेन्नईचा वेंकट आणि उत्तरांचलचा कैलाश हे सगळेच जण, सारखंच शिक्षण घेतलेले, सारखाच पगार घेणारे... एक टीम म्हणून काम करू लागले आणि एक टीम म्हणून या अमेरिकेच्या मॅनेजरशी एकेरीत संवाद साधू लागले. सर्वांना एकाच पातळीवर आणून ठेवणारी ही फार मोठी आणि वेगळी गोष्ट आय.टी.नं इथल्या वर्ककल्चरमध्ये रुजवली. सपाटीकरणाची सुरुवात इथून झाली. ■

सुचेता कडेठाणकर, साप्ताहिक सकाळ, ५-४-०८

---

# धुळे जिल्ह्यातील दलितांच्या लोकोक्ती आणि त्यांचे सामाजिक संदर्भ

**प्रकाश भामरे**

खानदेशातील धुळे जिल्ह्याचा ग्रामीण परिसर म्हणजे अहिराणी बोलीचा केंद्रप्रदेश आहे. या भागात विभागानुसार ज्याप्रमाणे अहिराणी बोलीचे 'क्षेत्रीय भेद' आढळतात; त्याप्रमाणे विविध जाती-जमातींनुसार 'स्तरीय भेद'ही आढळतात. धुळे जिल्ह्यातील ग्रामीण भागात 'महार' ही एक वैशिष्ट्यपूर्ण जात आहे. समाजात दलित किंवा पूर्वास्पृश्य म्हणून गणल्या गेलेल्या या जातीच्या लोकपरंपरा, लोकवाङ्मय, लोकबोली आपले वेगळेपण जपून आहेत. हे वेगळेपण त्यांच्या लोकबोलीतील लोकोक्तींमधूनही व्यक्त होताना आढळते. महार समाजात प्रचलित असलेल्या लोकोक्तींमध्ये म्हणजेच वाक्प्रचार व म्हणींमध्ये त्यांच्या लोकजीवनाचे सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ आढळतात. लोकोक्तींमधील शब्दांना लोकरूढी, लोकप्रथा, लोकसंकेत यांमुळे वैचित्र्यपूर्ण आशय प्राप्त झालेला दिसतो.

म्हणी आणि वाक्प्रचार हा लोकवाङ्मयातील वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार आहे. मानसशास्त्रीय, समाजशास्त्रीय आणि समाजभाषावैज्ञानिक दृष्टीने त्यांचा अभ्यास क्वचितच केला गेला आहे. दैनंदिन जीवनात लोक म्हणींचा वापर अतिशय कुशलतेने करताना आढळतात. सामाजिक संज्ञापन प्रक्रियेतील तो महत्त्वाचा घटक आहे. मानवी स्वभावाचे विविध पैलू मोठ्या कौशल्याने व बुद्धिचातुर्याने म्हणींतून प्रकट होताना आढळतात.

लोकजीवनात प्रचलित असलेल्या म्हणी व वाक्प्रयोगांना लोकजीवनाचे अनेक संदर्भ लाभलेले असल्याचे जाणवते. लोकजीवनात रूढ असलेल्या म्हणी व वाक्प्रचारांना एक परंपरा असते. लोकजीवनातील अनेकविध सार्वत्रिक अनुभव म्हणी किंवा वाक्प्रचारांतून आविष्कृत होतात. त्यामुळे निरनिराळ्या लोकसमूहात एकाच अर्थाच्या म्हणी प्रचलित असलेल्या आढळतात. उदा० ''यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः'' ''व्हेअर देअर इज स्मोक देअर इज फायर'', ''विस्तव असल्याशिवाय धूर निघणार नाही'', ''नरम असाबिगर पानी मराव नही'' (=भुसभुशीत जमिनीशिवाय पाणी

मुरत नाही) या संस्कृत, इंग्रजी, मराठी व अहिराणी भाषांमधील म्हणींचा लक्ष्यार्थ एकच आहे, असे दिसेल.

लोकजीवन आणि म्हणी यांचा संबंध अतिशय घनिष्ठ आहे. म्हणींच्या वापरामुळे लोकांची भाषावृद्धी होते. म्हणींच्या द्वारे समाजशास्त्राच्या अभ्यासकांना त्या समाजाचा अभ्यास करणे सोपे जाते. कारण म्हणींतून सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ समर्थपणे आविष्कृत होतात. संबंधित समाजाचे सामाजिक-सांस्कृतिक जीवन जतन करण्याचे काम 'लोकोक्ती' करतात. म्हणी भाषेतील लुप्त होऊ पाहणारे शब्द वाचवतात. एकंदरीत लोकजीवनातील विविध रंग लोकोक्तींतून अभिव्यक्त होतात.

धुळे जिल्ह्यातील महार समाजाच्या अहिराणी बोलीत ज्या लोकोक्तींचा वापर होतो त्यांना सामाजिक, सांस्कृतिक संदर्भ असल्याचे आढळते. उदा० धुळे जिल्ह्यातील ग्रामीण महार समाजात विवाहविषयक काही प्रथा आहेत. त्या प्रथांविषयी माहिती असल्याशिवाय त्या म्हणींचा अर्थ आपल्याला कळणार नाही. जसे - ''बाईंना फुले बाईले नि शाबासी मन्हा याहीले'' या म्हणीतील प्रत्येक शब्दाचा अभिधात्मक अर्थ आणि लाक्षणिक अर्थ वेगळा आहे आणि त्यातून पुन्हा संपूर्ण म्हणीची लक्षणा वेगळीच आहे. या म्हणींत 'बाई' या शब्दाचा अर्थ नववधू, 'फुले' या शब्दाचा अर्थ लग्नकार्याचा खर्च पेलण्यासाठी वधूपित्याला मिळालेली वरपित्याकडची आर्थिक मदत, 'याही' या शब्दाचा अर्थ व्याही होय. मुलीच्या किंवा नियोजित वधूच्या नावाने मिळालेल्या आर्थिक मदतीतून लग्नाचा खर्च भागविणे; व लोकांच्या धन्यतेस पात्र ठरणे. नवरीच्या नावाने नवरदेवाच्या बापाकडून नवरीच्या बापाला पैशांची मदत केली जाते. त्यातून लग्नसमारंभ पार पडतो व नवरीचा बाप त्याचे काही योगदान नसताना शाबासकीस पात्र ठरतो, असा या म्हणीचा सामाजिक संदर्भ आहे. हा संदर्भ महार जातीच्या विवाहप्रथेतून आलेला आहे. पूर्वीच्या काळी महार समाजात गरीब वधूपित्याला वरपिता जी मदत करायचा त्या मदतीला 'हातबाही' असा शब्द प्रचलित आहे. या 'हातबाही' रूपाने मिळालेल्या मदतीत लग्नसमारंभ पार पाडला जात असे. आज या म्हणीचा अर्थ 'त्याग एकाचा व शाबासकी दुसऱ्याला' असा लक्षणेने घेतला जातो.

'रायरंग' ही महार जातीतील एक पोटजात होती. आज ही जात महारांमध्ये विलीन झाली आहे. जुन्या काळात रायरंग हे लोककलावंत महारवाड्यात येऊन रामायण-महाभारतातील कथाभागावर रात्रभर सोंगे वठवून महार स्त्री-पुरुषांचे मनोरंजन करायचे. राजाचे सोंग वठवून रायरंग रात्रभर राजेशाही थाटाने बोलायचा, वागायचा. सकाळी मात्र त्याच्याकडे कोणी ढुंकूनही पाहात नसे. अशा विसंगत अनुभवातून ''रायरंग रातभर राजा नि सकायमा ऊठी पानी कोनी पाजा'' ही म्हण निर्माण झाली

आहे. महार जातीत प्रचलित असलेल्या म्हणी महारेतर जातीतील लोकांना कळत नाहीत; कारण या म्हणींचे आकलन होण्यासाठी संबंधित समाजाचे सामाजिक सांस्कृतिक जीवन परिचित असणे गरजेचे आहे. काही गोष्टी तात्कालिक असतात, याचे भान प्रत्येकाने ठेवले पाहिजे. प्रत्येकाचा विशिष्ट काळ असतो. नंतर त्याला समाजात कोणीही विचारत नाही, असा या म्हणीचा अर्थ आहे.

काही म्हणींतून कुटुंबातील विशिष्ट नातेसंबंधातील ताण-तणावांचे दर्शन घडते. सासू-सून, नणंद-भावजय हे नातेसंबंध संघर्षमय आढळतात. त्याला महार समाजही अपवाद नाही. उदा० ''भाडाना घरथीन झोपडी बरी नि रांडमूंड ननीनथीन सयेत बरी'' या म्हणीतून नणंद-भावजयीच्या संघर्षपूर्ण नात्यावर प्रकाश पडतो. ननीन म्हणजेच नणंद मुळातच वाईट त्यात पुन्हा 'रांडमूंड' म्हणजे विधवा असेल तर तिचा मुक्काम कायमस्वरूपी माहेरी. अशा परिस्थितीत भावजयीच्या उखाळ्या-पाखाळ्या काढून भाऊ-भावजयीचे भांडण लावण्यात तिला धन्यता वाटते. कारण जे सुख तिला मिळाले नाही, ते इतरांनाही मिळू नये, ही माणसाची स्वाभाविक प्रवृत्ती असते. सवत परवडली परंतु नणंद घरात नको, या निर्णयापर्यंत संबंधित घराची सून आलेली असते. अशा कौटुंबिक वास्तवातून प्रस्तुत म्हण निर्माण झाली आहे. काही वेळेस दोन्ही गोष्टी घातकच असतात, तेव्हा कमी घातक कोण, याचा निर्णय घ्यावा लागतो, 'दगडापेक्षा वीट मऊ' या न्यायाने विधवा नणंदेपेक्षा सवत परवडली.

महार समाजात पूर्वीच्या काळी एकापेक्षा जास्त बायका करण्याची प्रथा होती. गावकामासाठी अनेक स्त्रियांची गरज पडण्यातून हा रिवाज निर्माण झाला असावा. किंवा महार जातीतील पुरुषांच्या लैंगिक आसक्तीतून ही प्रथा निर्माण झाली असावी. त्यातून ''दुसार ऱ्हयनी रानी, पयली वाहे पानी'', ''दुसरी उनी घरमा, पयली गयी गोरमा'' अशा म्हणींची निर्मिती झालेली आहे. 'दुसरी' म्हणजे 'दुसरी बायको', 'पयली म्हणजे 'पहिली बायको', दुसरी बायको येण्याने पहिल्या बायकोचे हाल होतात; म्हणून ती लवकर मरते म्हणजे 'गोरमा' जाते 'गोर' म्हणजे प्रेताला पुरण्याचा खड्डा. महार जातीत मृताला पुरण्याची प्रथा आहे. त्यातून हा शब्द प्रस्तुत म्हणीत आला आहे. दुसरी बायको नवीन असल्यामुळे स्वाभाविकच तिचे नवऱ्याकडून हट्ट किंवा लाड पुरविले जायचे व पहिल्या बायकोकडे दुर्लक्ष केले जायचे. अशा अनुभवातून प्रस्तुत म्हण निर्माण झाली आहे. एकाच्या येण्याने दुसऱ्याचे महत्त्व कमी होणे, किंवा त्याचे नुकसान होणे असा या म्हणीचा लक्ष्यार्थ आहे.

महार समाजात गंधर्व पद्धतीने स्त्रियांचे पुनर्विवाह होतात, त्याला 'गंदोरं' किंवा 'मोथीर' असे म्हणतात. या विवाह प्रकारामध्ये वयस्क माणसाबरोबर विवाहबद्ध व्हावे

लागत असे. त्यातून ''धल्ला नवरा कया, कुयले आसरा झाया'' ही म्हण निर्माण झालेली आहे. 'धल्ला नवरा' म्हणजे म्हातारा नवरा. तो कामजीवनाच्या बाबतीत कमकुवत असला तरी वंश चालविण्यासाठी म्हणजे 'कूय' 'कूळ' चालविण्यासाठी आधार असतो. संबंधित स्त्रीला कामजीवनापेक्षा मूल-बाळ होणे जास्त महत्त्वाचे वाटत असे. अशा भावनेतून तरुण स्त्रिया म्हाताऱ्या नवऱ्याबरोबर 'गंदोरं' पद्धतीने लग्न लावत असत. अशा अनुभवातून प्रस्तुत म्हण निर्माण झाली आहे. 'एखादी गोष्ट अजिबात नसण्यापेक्षा काहीतरी असणे बरे' असा या म्हणीचा लक्ष्यार्थ आहे.

वरील प्रकारच्या विवाहसंबंधातून नवीन समस्या निर्माण होत असे. त्यातून ''धल्ला नवरा सदीमे निजे, जुवान बायको रातभर खिजे'' ही म्हण निर्माण झाली आहे. प्रस्तुत म्हण विजोड संसाराचे चित्र अधोरेखित करते. 'धल्ला नवरा' म्हणजे लैंगिकदृष्ट्या कमकुवत नवरा व 'जुवान बायको' म्हणजे 'तरुण पत्नी' किंवा तारुण्याने मुसमुसलेली बायको. 'रातभर खिजे' म्हणजे लैंगिक अतृप्तीतून रात्रभर अस्वस्थता अनुभवणे किंवा तळमळत राहणे. विरोधी गुणधर्माच्या व्यक्ती एकत्र येण्याने समस्या निर्माण होतात, किंवा दु:खच निर्माण होते असा या म्हणीचा लक्ष्यार्थ सांगता येईल.

अशा प्रकारे सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ असलेल्या म्हणी महार जातीच्या अहिराणी बोलीत विपुल प्रमाणात आढळतात. अजून काही म्हणींचा उल्लेख करता येईल - (१) ''घरमा फुटेल बोयका नि मांगस दोन-दोन बायका'', [=घरात गाडगे फुटके, बायका मात्र हव्यात दोन-दोन] (२) ''तुले माले सांगाले भगतीन आनी घुमाले'', [=तुम्हांआम्हांला सांगायला भगतीण, प्रत्यक्षात असते वेगळीच] (३) ''नाईकभाऊले वाडा भ्याये नि घरनी बाई बाहेर पये'', [=नाईकाला - वस्तीच्या प्रमुखाला - सगळा गाव घाबरतो, पण त्याच्या बायकोचे संबंध भलत्याशीच] (४) ''भन्दं न्हायनं देववर भगत गया शीववर'', [=प्रेतात्म्यांना शांत करण्यासाठी तयार केलेले तळलेले पदार्थ घरातील देवाच्या ठाण्याजवळ विसरून गावसीमेवर प्रेतात्म्यांना शांत करण्यासाठी जाणे] (५) ''महारनं आख्खं गाव नि त्याने नही कोठे ठाव'', [=गावकामगार म्हणून महार आख्ख्या गावाचा, पण राहण्यासाठी मात्र त्याला गावात घर नाही. त्याचं ठिकाण गावाबाहेरच] (६) ''खरानं ऱ्हयनं खोटं नि छिनालनी गाव लुटं'', [=चांगल्या शीलाच्या बाईला हास्यास्पद ठरवून छिनाल बाई साऱ्या गावाला आपल्या कह्यात ठेवते.] (७) ''गावमा ऊना पोया नि महारले आनन झाया'', [=गावात पोळा असला की गावकामगार महाराला आनंद होतो. (कारण त्याला पोळा सणाला धान्य, कापड असं बलुतं मिळतं.)] (८) ''नदारीमा सिरीमंती ऊनी ते बोबड्या बोले नि, धयडपने दिन ग्यात ते पोट काढी चाले'', [=एखाद्या दरिद्री

माणसाला अचानक श्रीमंती आली तर ती त्याला पचत नाही. म्हातारपणी दिवस गेलेली बाई साऱ्या गावाला आपलं पोट दाखवत फिरते.] अशा शेकडो म्हणी आढळतात. या म्हणी केवळ दलित-महार समाजाच्या अहिराणी बोलीतच आढळतात. त्यांच्या समाजभाषावैज्ञानिक अभ्यासातून एक नवी बाजू पुढे येईल.

म्हणींप्रमाणेच महार जातीच्या वाक्प्रचारांना सामाजिक-सांस्कृतिक, धार्मिक संदर्भ आढळतात. जसे - ''शीव दाबनी पडी'', ''खोयमा टाकेल से'', ''आकडी धरेल से'' इत्यादी अनेक वाक्प्रचारांना लोकविधी, लोकप्रथांचे संदर्भ आढळतात. महार जातीत पूर्वीपासूनच विधवांचे पुनर्विवाह करण्याची प्रथा रूढ आहे. मात्र असे पुनर्विवाह आजही हळद लावून होत नाहीत. 'गंदोरं' पद्धतीने हा विवाह अर्ध्या रात्री केला जातो. या पद्धतीने विवाहबद्ध झालेल्या पतिपत्नीला कोणत्याही धार्मिक किंवा मंगल कार्यात सहभागी होता येत नाही. अशा पद्धतीने विवाहित झालेल्या जोडप्यावर दुष्ट शक्तींची अवकृपा असते म्हणून ज्या रात्री हा विवाह केला जातो त्याच रात्री भगत त्या जोडप्याला गावाच्या सीमेवर म्हणजेच 'शीव'वर घेऊन जातो व मंत्र-तंत्र विधी करून दुष्ट शक्तींना शांत करतो त्याला 'शीव दाबणे' असे म्हणतात. 'शीव' दाबल्यामुळे दुष्ट शक्ती गावाची सीमा ओलांडू शकत नाहीत असा समज आहे. 'शीव' दाबल्यानंतर त्याच रात्री त्यांचा संबंध आला पाहिजे असा संकेत आहे. अशा रूढीतून प्रस्तुत वाक्प्रयोग निर्माण झाला आहे. अशुभ निवारण करणे, अडथळा दूर करणे अशी या वाक्प्रयोगाची लक्षणा आहे.

धुळे परिसरातील महार जातीत खंडोबा किंवा खंडेराव महाराज या लोकदैवताला धर्मांतरानंतरही महत्त्वाचे स्थान आहे. संकटनिवारक लोकदैवत म्हणून या दैवताकडे पाहिले जाते. खंडोबाच्या नावाने 'गोंदय' (गोंधळ) देण्याची प्रथा प्रचलित आहे. हा गोंधळाचा कार्यक्रम विशिष्ट प्रसंगी ठेवण्याची प्रथा आहे. जसे कुटुंबातील मोठ्या मुलाचे लग्न करायचे असेल तर लग्न लावण्यापूर्वी 'गोंदय' देण्याची प्रथा महार जातीत आहे. परंतु संबंधित कुटुंबाची आर्थिक परिस्थिती एकाच वेळी गोंधळाचा खर्च व लग्नकार्याचा खर्च पेलण्याइतकी नसेल, तेव्हा नियोजित वराची आई किंवा वडील खंडोबाच्या नावाने 'आकडी' धरतात. 'आकडी धरणे' म्हणजे खंडोबाचा गोंधळ जोपर्यंत दिला जात नाही तोपर्यंत बोकडाचे किंवा मेंढ्याचे मांस न खाण्याची प्रतिज्ञा करणे किंवा निश्चय करणे. 'त्यानी आकडी धरेल से' असा वाक्प्रयोग ह्या प्रथेतून आलेला आहे. ही पार्श्वभूमी कळल्याशिवाय प्रस्तुत वाक्प्रयोगाचा अर्थ कळत नाही. 'आकडी धरणे'चा लाक्षणिक अर्थ प्रतिज्ञा करणे, निश्चय करणे असा आहे.

धुळे जिल्ह्यातील ग्रामीण भागात पूर्वी कुणबी दांपत्याच्या पोटी जन्मलेल्या मुलाला

मृत्यूपासून वाचविण्यासाठी महार स्त्रीच्या 'खोय' म्हणजे ओटीत टाकण्याची प्रथा होती. आजही ही प्रथा काही गावांमध्ये प्रचलित असल्याचे आढळते. कुणबी समाजातील काही जोडप्यांचे अपत्य जन्मल्यानंतर मृत्यू पावत असे. अशा मृत्यूचा अर्थ दुष्ट शक्तींची नजर आहे असा लावला जात असे. या संकटावर उपाय म्हणजे त्या अपत्याला महार स्त्रीच्या ओटीत विधिपूर्वक टाकणे. एकदा हे मूल महार स्त्रीच्या ओटीत टाकले म्हणजे दुष्ट शक्ती त्याचे काहीही करू शकणार नाही अशी समजूत होती. अशा ओटीत टाकलेल्या मुलाचे नाव 'महारू' असे ठेवले जात असे. ''त्याले महारीणना खोयमा टाकं तवय तो जगना'' अशी वाक्ये आजही ऐकायला मिळतात. त्यातून 'खोयमा टाकेल से' किंवा 'खोयमा टाकणे' हा वाक्प्रयोग निर्माण झाला आहे. याचे लाक्षणिक अर्थ दुष्ट शक्तींपासून वाचविणे, अवकृपा टाळणे, सुरक्षित ठिकाणी ठेवणे असे घेतले जातात.

अशा प्रकारचे सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ असलेले वाक्प्रयोग महार जातीच्या अहिराणी बोलीत विपुल प्रमाणात आढळतात. जसे - (१) 'देरवट वायेल से', [=दिराबरोबर भावजयीचे लग्न करणे (घरातील वस्तू घरच्यालाच देणे)] (२) 'महार वर देनं पडीन', [=महार दांपत्याला जेवू घालणे] (३) 'बाबत्या झेलन्या पडथीन', [=अहेर करणे, साडीचोळी घेऊन देणे] (४) 'सोडवन करनी पडी', [=(महार स्त्रीच्या ओटीत टाकलेल्या मुलाला लग्नाची हळद लावण्यापूर्वी महार स्त्रीच्या ओटीतून त्याची) विधिपूर्वक सोडवणूक करावी लागते.] (५) 'हातबाही देनी पडी', [=हाताची बाही (फूल ना फुलाची पाकळी) देणे] (६) 'डेरगं भरनं पडीन', [=घडा भरणे (मृतात्म्याच्या शांतीसाठी नातेवाईकांनी पक्वान्ने वगैरेनी मातीचा घडा भरण्याचा विधी करणे)] (७) 'न्हानी पूंजनी पडी', [=सटवीला शांत करणे. बाळंतिणीच्या आंघोळीची जागा पुजणे] (८) 'रिंगन भरनं पडी', [=कडक मंत्रतंत्रादि उपचार करणे] (९) 'लंगर तोडना पडी', [=(खंडोबाची) साखळी तोडणे] (१०) 'आठखोय मोडी ल्या', [=नाट मोडणे, पतिपत्नीचे मीलन घडविणे] (११) 'पोट खाले येयेल से', [=पहिल्या पतीचे अपत्य सोबत येणे] (१२) 'सल्ल्या काढना पडी', [=सरडा बाहेर काढणे (मनातली शंका दूर करणे - भ्रम दूर करणे] (१३) 'कडी चढी जावो', [=घराला कुलूप लागणे, सत्यानाश होणे] (१४) 'काटं लागी जावो', [=घराभोवती काट्यांचे कुंपण लागणे, सत्यानाश होणे] (१५) 'भादीमायनी शप्पत', [=भादी देवीची शपथ खाणे. (कधीही खोटं न बोलण्याची प्रतिज्ञा करणे)] इत्यादी वाक्प्रयोगांच्या अभिधार्थांना सामाजिक संदर्भ आहेत. हे सामाजिक संदर्भ महार जातीच्या लोकजीवनातून प्राप्त झालेले आहेत. धुळे जिल्ह्यातील महार जातीच्या

अहिराणी बोलीत-लोकोक्तींचे समृद्ध भांडार आढळते. प्रस्तुत लोकोक्ती महार जातीचे सामाजिक-सांस्कृतिक-धार्मिक जीवन अगदी सोप्या भाषेत व्यक्त करताना आढळतात. लोकवाङ्मयातील किंवा लोकबोलीतील हा 'मौलिक ठेवा' नीट जतन करून पुढील पिढीच्या हवाली करणे त्या-त्या समाजाचे कर्तव्य ठरते.

संदर्भ :

(१) 'लोकसाहित्याची रूपरेखा' - दुर्गा भागवत

(२) 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश' - संपा. य.रा. दाते, चिं.ग. कर्वे

(३) 'लोकवाङ्मय रूप-स्वरूप' - डॉ. शरद व्यवहारे

मुलाखती :

(१) श्री. शंकर भिवा भामरे, मु.पो. कापडणे, ता.जि. धुळे.

(२) श्री. किसन नथ्थू मोरे, मु.पो. कापडणे, ता.जि. धुळे.

(३) श्रीमती लक्ष्मीबाई अर्जुन भामरे, मु.पो. कापडणे, ता.जि. धुळे.

(४) श्रीमती येसाबाई हिरचंद भामरे, मु.पो. कापडणे, ता.जि. धुळे.

■

अजिंठा-28, रघुवीरनगर, खोडाईमाता रोड, नंदुरबार 425412,
भ्रमणभाष : 9822294255

---

## पायरीबद्ध प्रक्रिया का ?

हल्ली कोणाला वाचायला काय आवडतं असं विचारलं, तर जास्तीत जास्त लोकांचा कल 'सेल्फ हेल्प' प्रकारच्या पुस्तकांकडे असतो. यामध्ये सपाटीकरण आलंय. 'सेव्हन हॅबिट्स ऑफ हायली इफेक्टिव्ह पीपल', 'ट्वेल्व वेज टु लीड हेल्थी अँड सक्सेसफुल लाइफ', 'टेन स्टेप्स टुवर्डस मेंटल सॅटिस्फॅक्शन', 'एटिफाइव्ह टिप्स टु लुज वेट'. असंच काहीतरी. म्हणजे सगळं आकड्यांच्या किंवा स्टेप्सच्या भाषेत हवं. याचा संबंधसुद्धा आय.टी.मधल्या एका विशिष्ट प्रकारच्या कार्यपद्धतीशी लावता येऊ शकेल.

आय.टी.मध्ये करता येण्याजोग्या प्रत्येक गोष्टीची एक 'प्रोसेस' बनवून टाकलेली आहे. एका विशिष्ट पद्धतीनेच प्रश्नांची उत्तरं शोधली गेली पाहिजेत. एका विशिष्ट पद्धतीनं किंवा क्रमानंच एखादी गोष्ट केली गेली पाहिजे हा आग्रह. कारण एकच : कोणीही ती गोष्ट केली, त्याच क्रमानं केली आणि काही कारणानं ती गोष्ट अयशस्वी झाली तर नेमक्या कोणत्या स्टेपमध्ये गोची आहे हे पटकन लक्षात यावं ! ■

सुचेता कडेठाणकर, साप्ताहिक सकाळ, ५-४-०८

---

# भाषेतील म्हणींचे संचित

विद्या वासुदेव प्रभुदेसाई

भाषेतील विविध अवस्थांतरांचे दर्शन प्रामुख्याने भाषेतील म्हणी, वाक्प्रचार आदी भाषिक रूपांतून घडते. एखाद्या समाजाचे जीवन, त्या समाजातील प्रचलित समजुती, त्या समाजाची संस्कृती या साऱ्यांचे संदर्भ भाषेतील म्हणी, वाक्प्रचारांसारख्या भाषेच्या अवशेषांतून मिळतात. वास्तविक भाषेतील म्हणी, वाक्प्रचारांतून मिळणारे ज्ञान हे अनुमानाचे ज्ञान असते. पहिल्या पिढीच्या अनुभवाला आलेले प्रत्यक्ष ज्ञान दुसऱ्या पिढीकडे जाताना अनुमानाच्या पातळीवर येते आणि म्हणूनच भाषेतील म्हणी म्हणजे भाषेचे संचित अथवा भाषेतील लेणी असे मानले जाते. अर्थात वर्तमानकालीन समाजात भाषेतील या म्हणींकडे जरी फारसे लक्ष दिले जात नसले तरी समाजाच्या एकूण इतिहासात असलेले म्हणींचे महत्त्व नाकारता येत नाही. आजच्या बदललेल्या जीवनशैलीमुळे 'अनुभवाचे बोल ते न ठरती फोल' ही गोष्ट आजच्या समाजाला तितकीशी पटणारी नाही. प्रत्येक पिढीतच नव्हे; तर एकाच पिढीत सुद्धा समस्येचे स्वरूप बदलत गेलेले दिसते. त्यामुळे आजोबाचे शहाणपणाचे बोल नातवाच्या समस्या सोडविण्यास तर अपुरे ठरतातच; पण बऱ्याचवेळा पुढच्याला ठेच लागून पाठच्याने शहाणे होण्यासारखीही परिस्थिती असतेच असे नाही. म्हणी म्हणजे अनुभवाचे सार सांगणाऱ्या चटकदार, अर्थगर्भ अशा उक्ती होत. आपल्या बोलण्यात प्रसंगानुरूप चटकदार अशा तयार उक्तींचा वापर करणे ही एकेकाळी बोलीची लकब तर होतीच; पण त्याचबरोबर ते भाषेचे भारदस्तपणही मानले जाई. चटकदार अशा छोट्याशा उक्तीमधून एखादे जीवनविषयक तत्त्वज्ञान, जीवनदृष्टी अथवा जीवनाचे सार सांगून त्यातून बोलणारा समोरच्या माणसासमोर नकळतपणे अनुभवाचे दालन उघडे करीत असे. कारणे कोणतीही आणि कितीही असली तरी एकेकाळी भाषेचे चैतन्य असलेल्या म्हणी आज मात्र भाषिक अवशेषरूपात राहिल्या आहेत. बदलती सामाजिक आणि सांस्कृतिक परिस्थिती तसेच बदलत्या जीवनशैलीमुळे भाषेत व्यक्त झालेले हे अनुमानाचे ज्ञान नष्ट होईल की काय अशी भीती वाटू लागली आहे.

समाजाच्या संस्कृतीतील प्राकृतिकतेचे दर्शन तसे पाहता म्हणींतूनच घडते. समाज

ही संकल्पनाच मुळी भाषेशी जोडली गेली आहे. कारण एक भाषा बोलतो तो एक समाज असे स्थूलपणे मानले जाते. अर्थात एक मातृभाषा असलेला वा एक प्रादेशिक भाषा बोलणारा समाज तसा एकसंध असला तरी एकसुरी नसतो. कोंकणी समाजाचा विचार करताना वरील विधानाची यथार्थता पटते. 'कोंकणी समाज' ही संकल्पना स्थूलपणे कोंकणात राहणारा आणि संज्ञापनासाठी कोंकणी भाषेचा वापर करणारा समाज याच्यासाठी वापरली जाते. संज्ञापनासाठी कोंकणीचा उपयोग करणारा सर्व जातीजमातींचा, संपूर्ण कोंकणप्रदेशात विखुरलेला छोटा-मोठा प्रादेशिक समाजगट म्हणजे कोंकणी समाजगट होय. कोंकणी बोलणारा समाजगट मग तो प्रांतीयदृष्ट्या महाराष्ट्रीय (मालवणी) असो, गोमंतकीय असो वा मंगळुरी असो; शिवाय तो प्रत्यक्ष व्यवसाय वा शिक्षणाच्या निमित्ताने जगाच्या पाठीवर कुठेही वावरणारा असो त्याचे सहजोद्‌गार, त्याची मानसिकता, त्याची एकूण व्यक्तिगत अभिव्यक्ती ही पारंपरिक म्हणजे कोंकणीच असते. प्रमाणभाषा, व्यावसायिक भाषा म्हणून जरी व्यावहारिकदृष्ट्या त्याला कोणतीही भाषा स्वीकारावी लागली तरी त्याची आत्म्याची भाषा ही पारंपरिक आणि सांस्कृतिक वारसाच घेऊन येताना दिसते. म्हणूनच समाजाच्या सांस्कृतिक परंपरेचे दर्शन घडविण्यासाठी भाषेतील म्हणी उपयुक्त ठरतात. कोंकणी समाजाच्या अंतरंगाचे दर्शन घडविणाऱ्या कोंकणी म्हणींमधून कोंकणातील चालीरिती, नातेसंबंध, सण-उत्सव, प्रादेशिक संदर्भ अशा एक ना अनेक विस्तारित जीवनानुभवांचे दर्शन घडते. म्हणी म्हणजे भाषेतील गोठवलेले ज्ञान होय. अशा या गोठवलेल्या भाषिक रूपातून कोंकणी माणसाची प्राकृतिक जडण-घडण, कोंकणातील निसर्ग, पशु-पक्षी या साऱ्यांचे प्राकृतिकतेशी नाते जोडणारे या म्हणींमधील संज्ञापन जितके नैसर्गिक आहे तितकेच ते रांगडेही आहे. श्लील-अश्लीलतेच्या पलीकडे जाणारे हे अनुभव-प्रकटीकरण असल्याने त्यांमध्ये कोंकणी समाजमनाचे अत्यंत उघडे-वाघडे दर्शन घडते आणि त्याचबरोबर बदलत्या परिस्थितीनुसार बदलत जाणारे रंगही दिसतात. मौखिक परंपरेने जपून ठेवलेल्या आणि आता केवळ लोकपरंपरेचे संकलन करावे म्हणून संकलित करून ठेवलेल्या म्हणींमध्ये स्थलकालानुसार झालेले बदल हा भाषिक परिवर्तनाचा एक प्रकार म्हणता येईल.

कोंकणप्रदेशात मौखिक परंपरेने सांभाळून ठेवलेल्या काही म्हणी मालवणी, कोंकणी (गोमंतकी) आणि काही प्रमाणात मराठी या तीनही भाषांमध्ये सारख्याच आढळतात. काही म्हणींमध्ये प्रादेशिक वैशिष्ट्यांनुसार शब्दभेद झालेला दिसतो, तर काही म्हणी पूर्णतया परिवर्तित रूपांत पुढे येताना दिसतात. एकूणच लघुता, व्यावहारिकता आणि लोकमान्यता हे तीन गुण घेऊन आलेले कोंकणीमधील हे भाषिक

धन म्हणजे कोंकणी म्हणी होत. म्हणींचे रूप आटोपशीर असावे लागते आणि हे आटोपशीर रूप लवचीक असल्यामुळेच स्थलकालपरिस्थितीनुरूप अनुभव जिवंतपणे व्यक्त करण्याचे सामर्थ्य त्यात असते. पूर्वजांच्या संचित ज्ञानाचा कोश असलेल्या कोंकणी भाषेतील म्हणींमधून कोंकणी माणसाच्या मार्मिकपणाचे रोखठोक स्पष्टपणाचे तसेच त्याच्यातील रांगडेपणाचेही दर्शन घडते.

मालवण किंवा सिंधुदुर्ग प्रदेश हा भौगोलिक दृष्ट्या गोमंतकाला जवळ जाणारा असला तरी राजकीय दृष्ट्या गेली कित्येक दशके तो महाराष्ट्राशी जोडलेला आहे त्यामुळेच मराठी आणि गोमंतकी कोंकणीतील अनेक सामाजिक तसेच सांस्कृतिक संदर्भ मालवणी बोलीत सहज सापडतात. बोलताना म्हणींचा सहज वापर करणे ही मालवणी बोलीची खास लकब होय. मालवणीत वापरल्या जाणाऱ्या या म्हणींचा तौलनिक अभ्यास केल्यास त्यांत गोमंतकी कोंकणी, तसेच मराठीतील अनेक संदर्भ सापडतात. काही ठिकाणी केवळ भाषिक परिवर्तन दिसत असले तरी काही ठिकाणी प्रदेशानुसार झालेले अर्थपरिवर्तनही दिसते. उदा० मालवणी कोंकणीत 'आग खांव काय वाघ खांव' ही म्हण आलेला प्रचंड राग व्यक्त करते, तर मराठीत हाच अर्थ 'दही खाऊं की मही खाऊं' या म्हणीतून व्यक्त होतो आहे. 'आगासला ता मागासला पाठसून इल्ला गुरवार जाला' या म्हणीतून नंतर आलेल्याने अगोदर आलेल्यापेक्षा प्रगती करणे असा अर्थ व्यक्त होत असून 'कानामागून आली आणि तिखट झाली' ही मराठीतील म्हण जवळजवळ याच अर्थाची छटा घेऊन येते. काही जाणकारांनी कानामागून हा पानामागून या शब्दाचा झालेला शब्दविपर्यास असून मिर्ची पानानंतर येते आणि पानापेक्षा तिखटपणा दाखवते असा अर्थ असल्याचीही शक्यता व्यक्त केली आहे 'आवशीची भयण मावशी, जीवाक जीवशी, बापाशीची भयण आका, डोळ्यांमुखार नाका', या मालवणी कोंकणीतील म्हणीप्रमाणेच 'आका दोळ्यामुखार नाका, मावशी ती मावशी खावपांक भरपूर दिवशी' अशी म्हण गोमंतकीय असून 'आना भयनी आका तूं म्हाका नाका, अम्मा भयिनी मावशी म्हाका पावशी' अशी म्हण मंगळुरी कोंकणीत वापरली जाते. मराठीतील 'माय मरो; पण मावशी उरो' या म्हणीतील थोडासा संदर्भ घेऊन येणाऱ्या या सर्व म्हणींमधून आईच्या बेंबीशी संबंध असलेल्या मावशी या नात्यातील जैविक संबंध व्यक्त झालेला दिसतो. 'आये आतकारीण, बाये पातकारीण, गिरजा धाकटेकारीण तुया तसला तर मियां असला' या मालवणी कोंकणीतील म्हणींच्या अर्थाला समांतर जाणारी गोमंतकी कोंकणीतील म्हण म्हणून 'म्हगेले धस्स, तुगेले फस्स' या म्हणीकडे पाहता येते. मालवणी कोंकणीत 'आमचो बाबगो काय करी, आसलाला नाय करी' अशी म्हण नालायक माणसाने

काम न करता कामाचे बारा वाजवणे या अर्थाने वापरली जाते. याच अर्थासाठी गोमंतकी कोंकणीत ‘कुड्डी उदकांक गेली आनी बुडकुलो फोडून घरां आयली’ अशी वापरली जाते. ‘गावात म्हाळ आणि कुत्र्याक बोवाळ’ या मालवणी म्हणीचा अर्थ व्यक्त करणारी गोमंतकी कोंकणीमधील म्हण म्हणजे ‘कोणाच्या व्हराडां कोण मुरड’ ही होय. कधी कधी केवळ भाषांतरातूनही म्हणीचे वेगळेपण राखलेले दिसते. उदा० ‘चेडक्या बांयत पडला आणि बोंद्राचो चिखल गेलो,’ या मालवणी कोंकणीतील म्हणीचे गोमंतकी कोंकणीत ‘सोबले बायंत पडले आनी कापड नितळ जाले’ असे भाषांतरित रूप दिसते. ‘बाळो माजो बाळो कोलत्यांनी खेळुं, घर जळल्यार जळूं पुण बाळो माजो खेळूं’ या मालवणी कोंकणीतील म्हणीचे रूप गोमंतकी कोंकणीत ‘निळू म्हजों निळू खलतें खेळूं, निळू म्हजो खेळूं’ या म्हणीत कोलती म्हणजेच जळते लाकूड या मालवणी म्हणीतील शब्दाचा विपर्यास होऊन खलते असा झाला असला तरी कोंकणीत आज प्रचलित असलेला अर्थ खलते म्हणने खलबत्त्यातील खल हा होय. खल ही अत्यंत जड लोखंडी वस्तू असून ती मुलाला खेळण्यासाठी देणे हा लाडाचा एक खास प्रकारच आहे. मराठीत हाच अर्थ घेऊन येणारी म्हण म्हणजे ‘लाडे लाडे केले वेडे’ ही होय. ‘घोवाच्या भयान घेतला रान, थंय भेटेलो मुसलमान, तेणां कापला नाक कान’ या मालवणी कोंकणीतील म्हणीप्रमाणेच गोमंतकी कोकणीत ‘मडक्यातल्यान कायलेन पडलो, कायलेतल्यान उज्यान पडलो, जळून गोबर जालो’ असा अनुभव येतो. मराठीतील ‘आगीतून सुटला फोफाट्यात पडला’ या अनुभवाशी जवळ जाणारा असा हा अनुभव आहे. ‘रिकामको सुतार बायलेचे कुले ताशी’ या मालवणी म्हणीत पायलेचे या शब्दाचे परिवर्तित रूप दिसते. पायली हे धान्य मोजण्याचे लाकडी माप ज्याचा तळ फार जाड असतो, त्यामुळे ही म्हण प्रचलित झाली असावी; परंतु कालांतराने पायलेचे या शब्दाचे विकृत असे रूप प्रचलित झाले असावे. गोमंतकी कोंकणीत हीच म्हण ‘बेकार मेस्त गांड तासता’ अशी वापरली जाते; तर मराठीत ‘रिकामा न्हावी भिंतीला तुंबड्या लावी’ अशा रूपात ती येताना दिसते. ‘वेताळाक नाय होती बायल आणि भावका देवीक नाय होतो घोव’ या मालवणी म्हणीचा अर्थ व्यक्त करणारी गोमंतकी कोंकणीतील म्हण म्हणजे ‘आरेल्या न्हवऱ्याक भुरेली व्हंकल’ ही होय. ‘नगाऱ्याची घाय थंय तुणतुण्याचा काय ?’ या मालवणी म्हणीतील अनुभव ‘हागऱ्याफुडे वागरे खंचे ?’ या गोमंतकी कोंकणीतील म्हणीत सापडतो. ‘उधार तेल खवटा’ या मालवणी कोंकणीतील म्हणीचा अर्थ ‘सवाय खाण पॉट फुगयता’ या म्हणीतून व्यक्त होतो.

एकूणच कोंकणीतील म्हणींचा खजिना अमर्याद असाच आहे. ‘माराक आयला

काय दिवाड म्हारवाडातच जाता', 'राजाचा न्हेसाण ता मडवळाचा पायपोसाण', 'माझा माका थोडा व्यायान धाडला घोडा', 'उपाजली कुळीया, दिली म्हादळीया दो हाती टाळिया वाजविली', 'जायाचा गो मोती, मुराडशीत किती, लाथ मारतीत आणि धेवन जातीत', 'म्हस घेवच्या आदि दाव्याचो गजाली कित्याक ?','अधिक ऊ तेका खाज नाय, अधिक ऋण तेका लाज नाय', अशा किती तरी म्हणींचा अभ्यास समाजजीवनाच्या अभ्यासास उपयुक्त ठरू शकतो. 'तोंणान मोग पोटांत फोग' (=मूँह में राम बगलमे छूरी), 'उदकान आसा मासो मोल करता पिसो' (=बाजारात तुरी, भट भटणीला मारी), 'वानात तकली घालतकीर मुसळाचो कसलो भय', 'जळोव आसा म्हण मरणांक उबो रांव ?' अशा किती तरी म्हणी या थोड्या प्रमाणात मनोवैज्ञानिक अभ्यासाला दिशा देऊ शकतील. थोड्या प्रमाणात का होईना, पण आजही कोंकणातील जनसमुदाय या अशा भाषिक संचिताचा वापर करताना दिसतो आणि म्हणूनच जागतिकीकरणाच्या रेट्यात अडकलेल्या या भाषिक खजिन्याचे रक्षण करण्याची वेळ आज येऊन ठेपली आहे.

■

**पी.ई.एस्.एस्.आर.एस्.नाईक महाविद्यालय**
**फर्मागुडी - फोंडा (गोवा.)**
**दूरभाष :** 0832-2312635 / 2335171

## लेखकांसाठी सूचना : १

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे. ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वतःचे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए.आर.' नको; 'अ.रा.' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी. लिखाणासोबत स्वतंत्र कागदावर स्वतःचा परिचय (शिक्षण, व्यवसाय, प्रकाशित लेखन इ०) थोडक्यात द्यावा. दूरध्वनी क्रमांक (संकेतक्रमांकासह) द्यावा.

# हद्दपार शब्द

लीला दीक्षित

भाषेमधे शब्द नाण्यासारखे असतात. ते सतत बोलीभाषेत, व्यवहारात, वाङ्मय-व्यवहारात सतत 'चालते' हवेत. नाण्याला फक्त अर्थ असतो. परंतु शब्द अर्थपूर्ण असतो. तो जीवनाशी साक्षात जोडलेला असतो. तो ज्यावेळी जीवनापासून तुटतो तेव्हा तो भाषेतून हद्दपार होण्याची प्रक्रिया नकळत सुरू होते. पूर्वी ग्रामीण जीवनात विवाहातून नाती निर्माण होत, ती जवळपासच्या गावातूनच. त्यामुळे नवीन येणारी सून या ग्रामव्यवहाराशी निगडित असे. शब्द तिला ठाऊक असत. आता शहरातील मुलगी सून म्हणून गावात गेली की ती या शब्दांविषयी अनभिज्ञ असते. एक घरचाच अनुभव सांगते. माझ्या भावाची नातसून आली. घरातीलच शेती. त्यामुळे वाडीत जाणे, काम करवून घेणे सारे ओघाने आलेच. नुकतीच गुहागरला गेले तेव्हा ती आणि मी वाडीत गेलो. तिथे वाडी बेणणाऱ्या बायकांना तिने सांगितले, 'वाडीतील सारं गदळ एकत्र करून जाळून टाका' मी सहज विचारले- ''यात काय काय आहे माहीत आहे तुला ?'' ''त्यात काय असणार ? ते सारं गदळ.'' मी त्या ढिगाशी उभी राह्यले आणि तिला सांगू लागले - ही झावळी, याची उभी दोन कांडी केली की दोन 'तळकटं' होतात. तळकट स्वतंत्र विणून परत ती एकत्र बांधली की 'झाप' होतो. ही माडाची पोय, नारळ लागतात त्याच्या मागील जो भाग असतो त्याला लगटून आहेत या 'पिचोंदऱ्या.' पातळ जाळीदार अशा. झावळीच्या पुढचा बुडखा कापला की तो होतो 'खाका'. झावळीच्या पात्या स्वतंत्र करून बांधायचा तो 'बिंडा'. पाती तासून काढली की मधे लवलवीत लांब तीन साडेतीन फूट पातळ पिवळसर भाग हाती राहातो तो 'हीर'. हिराची केरसुणी बांधायची. या केरसुणीची ही कितीतरी रूपे. केरसुणी सुंभाने 'पिंढ्यावर' (लाकडाचे पिढे) ठोकून काथ्याने-सुंभाने बांधायची. प्रथम ती असते 'लक्ष्मी'. ती देवघरात फिरते. मग होते 'वाढवण.' तिचा वावर माजघर, कोठी, स्वयंपाकघर असा. 'वाढवण' वापरून जरा कमी होते, ती 'केरसुणी.' ती ओटी, पडवी, अंगणात फिरू लागते. ती आणखी बुटकी होते, की होतो 'खराटा' तो थेट गोठ्यात पोहचतो शेण लोटायला. बाथरूम धुवायला, सारवायला. आता 'लक्ष्मी',

'वाढवण', 'केरसुणी', 'खराटा' ही एकाच वस्तूची बदलती रूपे.

'रामा गडी' नारळाच्या झाडावर 'पायंडा' अडकवून चढतो. तो सुंभाचा असतो. पण 'पायंडी' म्हणजे समुद्राकडे जाणारी छोटी वाट. नारळ पाडणारा 'पाडेकरी'. तो नारळाच्या 'पेंडीं' उतरवतो. 'पेंडसाने' निसतो (सोलतो) नारळ 'श्रीफल' फक्त देवघरात. नारळ देवापुढे 'वाढवतात' आणि स्वयंपाकासाठी 'फोडतात'. फोडलेल्या नारळाच्या दोन वाट्या. त्याला 'बक्कल'ही म्हणतात. नारळाची वाटी खरवडली की 'करवंटी' होते. ती घासून गुळगुळीत केली की रांगोळी ठेवायला 'भेली' होते. करवंटी फुटली की 'नरोटी' होते. 'वाटी', 'बक्कल', 'करवंटी', 'भेली', 'नरोटी' - एकाच वस्तूची ही रूपे. गाईला गोऱ्हा होतो, पाडस होते. म्हशीला रेडा किंवा रेडी होते. पण नवजात रेड्याला श्रीवर्धन भागात 'खोगा' म्हणतात.

वाडीत सुपाऱ्या गोळा करायला 'रोवळा' असतो; पण स्वयंपाकघरात तांदूळ धुवायला तिचे रूप संकोचते, बेताचे होते आणि ती 'रोवळी' होते. वाडीत नारळ भरून आणायला 'हारा' असतो. निसलेले नारळ घरात येतात ते 'पाटी'तून. हीच पाटी जरा साजिरं आणि बाळरूप घेऊन स्वयंपाकघरात अवतरते. ती होते 'दुरडी'. पोहे कांडायची 'साळ' धुवायला ती लागतेच.

आता गावात गोठे नाहीत. तिथेही पिशवीतून दूध येते. पोहे दुकानात मिळतात. त्यामुळे 'उखळ', 'कांडप', 'मुसळ', 'सारणी', 'दोमुखं' (दोन ठिकाणी मुख असलेले मातीचे मडके. त्यात पोह्याची साळ भाजली जायची) साळ भाजायचे 'घाटणे' हे सारे शब्द राहाणे मुश्कीलच नाही का ?

'निवणी' आणि 'अडणी' हे दोन शब्द. शंखाखाली देवघरात 'अडणी' असते ती कदाचित माहीत असेल. कोकणात बालपणी आमच्याकडे दूधदुभत्यासाठी विविध आकाराची मातीची मडकी होती. ती जमिनीवर स्थिर रहाण्यासाठी त्याच्याखाली आई 'निवणी' ठेवायची. 'निवणी' म्हणजे काश्यापासून केलेली गोल आकाराची वस्तू. मडक्याच्या आकारानुसार ही निवणी असायची. ताकाच्या डेऱ्याखाली लहान मुलाच्या मनगटाएवढी जाड गोल निवणी असायची. आता ताकमेढी (घुसळखांब) गेला, निवणी गेली, दुधाणीही गेली; कारण त्यांची गरजच संपली.

आज स्वयंपाकघरातील असे कितीतरी शब्द नवीन मंडळींना ठाऊक नाहीत. ते कदाचित कोशात रहातील. त्यांची जरा या ठिकाणी नोंद करते. पूर्वी भात चुलीवर शिजायचा. तांब्याचं एक मोठं सतेलं सतत चुलीवर असायचं. ते बाहेरून मशेरीने पूर्ण काळं व्हायचं. त्याला म्हणायचं 'मेशरं' किंवा 'मशेरकं'. स्वयंपाकाला पाणी सारखं त्यातून घ्यायचं. भात करायला आकारानुसार तांब्याची तपेली, सतेली असायची.

शेरभर भात मावेल ते 'शेरकं', तसंच 'दशेरकं' असायचं. तांदूळ मोजायला लाकडांचे 'निठवं' असायचं. भाताला तांदूळ काढायचे त्याला 'ओयरा' म्हणायचे आणि शिजत लावताना तो तपेल्यात 'वैरायचा'. फोडणी करायच्या मोठ्या लोखंडी पळीला म्हणायचे 'थाव्र'. भरपूर ताक ठेवायला असायचा 'गुंड'. तो कथलाचा असायचा. ताक वाढायला 'कथली' तर तूप वाढायला 'तांबली.' चूल पेटायची 'शेणी' किंवा 'गोव्री'ने. तिला 'थापट्या' पण म्हणत. ओगराळे, तसराळे, टोप, वेळणी (ताटली) रोवळी (बुरडाचीच असायची) वरणभात (एकात वरण एकात भात असं जोड भांडं. वर दांडा असे) बोगणी, भगुलं अशी नाना भांडी आठवताहेत.

कोकणात शंभर वर्षापूर्वीचं माझं घर आहे. ही सारी भांडी मी एका पेटाऱ्यात जपून ठेवली आहेत. माझ्या नातीला गंमत म्हणून दाखवते. आता संसार स्टीलचे आणि प्लॅस्टिकने चकाचक सजले. पितळ्याचे भांडे आता घरात दिसणेच कठीण. काही भांड्यांनी स्टीलचे आकार स्वीकारले. त्यामुळे पिंप, हंडा, परात, कळशी हे शब्द रहातील. पण 'बोगणी,' 'वरणभात,' 'कथली', 'गुंड' हे शब्द आता स्वयंपाकघरातून हद्दपार झाले. अजून दोन पिढ्यांत ते भाषेतून हद्दपार होतील आणि कदाचित कोशात रहातील. हे अटळ आहे. तरीसुद्धा जड वस्तूशीही माणसाचे मन जोडलेले असते. म्हणून त्यांची ही नोंद.

या साऱ्या शब्दांशी आमच्या पिढीचं भावपूर्ण नातं होतं. आता या शब्दांचं प्रेम नवीन पिढीला कसे रहाणार ? बदलते जीवन नवीन शब्द घेऊन येणे अपरिहार्य आणि अटळच आहे. या शब्दांनी आता राहायचे कोशात आणि कधी हाकारले तर साहित्यात !

■

**'ध्रुवा'**, 49/2, **सहजानंद, कोथरूड, पुणे** 411038.
**भ्रमणभाष :** 9422526041

## लेखकांसाठी सूचना : २

पुढील विषयासंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे : मराठी व अन्य देशीविदेशी भाषा (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ०), भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती.

# स्वयंपाकघरातील हरवलेले शब्द

शुभांगी रायकर

स्वयंपाकघराच्या रचना, तेथील वस्तू, त्यांचा वापर - सारेच बदलत आहे. आठवलं एका अगदी छोट्या टोपलीवरून. माझ्याहून सहासात वर्षांनी मोठी असलेली माझी आतेबहीण माझ्याकडे ती टोपली पाहून उद्गारली, ''अगो बाई मीना, तुझ्याकडे किती छान कुरकुला आहे.'' किती वर्षांनी कानावर पडला तो शब्द, मग आठवली दुरडी - तांदूळ धुण्यासाठी. परडी सुद्धा, पण ती फुले वेचून देवघरात ठेवण्यासाठी ! सर्वात मोठा तो हारा. पण ते नित्याचे नव्हेत. हाराभर, फुले, हाराभर आंबे असे कार्यप्रस्थालाच लागत. अशावेळी मंडईतील हारेवाली भाजी घेऊन आपल्या सोबत घरी येई.

नंतर आठवतात झाकण्या - गोठाच्या. वेळण्या बिनगोठाच्या. भांड्यांवर चपखल बसणाऱ्या. भातातलं पाणी वेळून टाकणं त्यामुळे सोपं जात असे. छोट्या मंडळींना पाणी पिण्यासाठी गडू, चंबू, बुडकुली किंवा झारी. मोठ्यांना फुलपात्र आणि गडवा, लोटी किंवा तांब्या. पूजेसाठी पंचपात्र. पातळ पदार्थ एकदाच भरपूर वाढता यावा-खेळत बसायला लागू नये म्हणून 'ओगराळं'. प्रवासात फिरकीचे तांबे; पेढेघाटी डबे, चटणी, मिठासाठी दगड्या. तुपासाठी तांबुली किंवा सतेलं. भात-वरणाच्या तपेल्या, आमटी भाजीच्या बोगण्या. निरुंद तोंडाचा गुंड आणि उभा गंज. निखाऱ्यावर साखरपाऱ्याच्या वड्या बनवण्यासाठी 'लंगडी', चुलीला जोडलेला 'वैल'. लोणच्याच्या बरणीला बांधायचा 'दादरा'. मोठ्या वाट्या - म्हणजे वाडगे. तर छोटे घमेले म्हणजे तसराळे. भाकरीचे पीठ मळायला काथवट. वरचे झाकण टोपीदार असणारं मोदकपात्र. छोटी ती मडकी. त्याहून मोठं गाडगं. मडक्याहून लहान बोळकं. त्याहूनही लहान 'खुलं.' गाडग्यात पीठ साठवणे किंवा तांदळाच्या वड्याचे पीठ भिजवणे. तर मडक्यात दहीभात ठेवून त्यावर पाणी ओतून ठेवला व सकाळी पाणी काढून टाकून खाल्ला तर भाताचा उंडा/उंडी - उन्हाळ्यात थंडावा देणारी ! भाज्यांमध्ये डाळ-दाणे म्हणजे व्यंजन. विरघळणारे म्हणजे 'हसणारे' अनारसे. 'चंदेरी' घाटाच्या वाट्या. धान्य मोजायच्या अधोल्या, पायल्या, पासरी. आणि सर्वात छोटा हाताचा 'पसा'. हंडा ठेवायची घडवंची, तर घागरी खाली चुंबळ. तुम्हांला आठवतात अजून काही ? ■

39/35, विजय अपार्टमेंट्स, कर्वे रस्ता, पुणे 411004. दूरभाष : 25424480





अनुक्रमणिका

# 'गाथा सप्तशती'तील मराठीचे दर्शन

शरदिनी मोहिते

सातवाहन राजा हाल याने महाराष्ट्रातील निरनिराळ्या भागातल्या कवींनी रचलेल्या हजारो गाथा गोळा केल्या. प्रसंगी त्यासाठी भरपूर धनही वेचले. कुंतल देशावर राज्य करणाऱ्या, स्वतः कवी असलेल्या या राजाने त्यातल्या निवडक गाथांचा संग्रह केला. 'गाथा सप्तशती' म्हणून हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या मूळ सातशे गाथांमध्ये नंतर थोडी भर पडली, आणि १००४ गाथा 'शेफालिका' या नावाने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केलेल्या ग्रंथात अनुवादासह वाचायला मिळतात. सुमारे इ.स. २०० ते ४५० या काळात, कदाचित त्याच्याही आधीपासून बोलल्या जाणाऱ्या महाराष्ट्री प्राकृत भाषेतल्या या अनमोल संग्रहातून आपल्याला त्या काळच्या सामाजिक जीवनाचा परिचय तर होतोच. शिवाय महाराष्ट्री प्राकृत हा मराठी भाषेचा पूर्वावतार असल्यामुळे त्या काळी मराठी माणसाच्या प्रत्यक्ष बोलण्यात असलेल्या बोली मराठी भाषेचा अंधुकसा का होईना अंदाज आपल्याला येतो... आजही आपल्या बोलण्यात असलेले काही शब्द त्या काळी आपले पूर्वजही जसेच्या तसे वापरत होते या जाणिवेने सुखावायला होते ... काही शब्द जसेच्या तसे आणि काही शब्द किंचित वेगळ्या रूपात आलेले पाहून, वाचून आपल्याला त्या काळच्या आपल्या वाणीची थोडीफार का होईना झलक अनुभवता येते. 'गाथा सप्तशती' वाचताना माझ्या नजरेला आलेल्या काही मराठी - महाराष्ट्री शब्दांची मी नोंद केली आहे. [शब्दांपुढे कंसात शतक क्रमांक व गाथा क्रमांक दिला आहे.]

तेव्हा, शेकडो वर्षांपूर्वीही आपण मामीला मामी च म्हटलं, (१.९३), आत्याला कधी अत्ता (४.६९), तर कधी पिउच्छा - पितृस्वसा - वडलांची बहीण म्हटलं (२.९५), दीर होता दिअर (५.७०), आईला माए (१.४३), तर मावशीला माउआ म्हटलं (४.२३), सवत ही सवत्ती (सपत्नी) आहे (५.२८), सावली साउलीच आहे (२.६९) (६.५), सुई ही सुईच आहे (७.२०), जुनं सुद्धा जुण्ण म्हणून आहे (३.२९), चिख्खल चिक्खलच आहे (१.६७), दिठी दिठ्ठी म्हणून दिसते, (२.३४) आणि अश्रू आहेत अंसू (२.५३), मज्झ - माझे (२.३१), तुज्झ - तुझे (१.७८),

१.८९) आढळते. त्याचप्रमाणे मज्झ तुज्झ - माझे तुझे (७.१) ही आढळते. अत्थे म्हटलं जाई आत्ता या अर्थाने (४.३७), अच्छेर म्हणजे आश्चर्य (२.१२), हे की सइ ही सती (२.२८), ही असते सखी प्रमाणे, आणि काकी, (२.२) म्हणजे काकू नसून चक्क कावळी असते ! तम्बे (६.३८) म्हणजे हे तांबू गाई. रुन्द म्हणजे रुंदच (७.४९), ओलं आहे ओल्लं (५.४०), कलिअं - कळले, ओळखले (७.१५), गूळ आहे गुलो (५-५४)... आजचा अय्या हा सुंदर उद्‌गार अव्वो म्हणून भेटतो ! (२.७८).

या काळातल्या आपल्या भाषेत होणं आहे - होसि - असती (१.६५), वसणं आहे - वसइ - वसती (१.३५), हिंडणं फिरणं आहे - हिण्डन्ती (१.३८), जाणं आहे - वच्च - तेथ न वचा असा महानुभावकालीनही वापर (२.६०) आढळतो. रमणं आहे - रमिउण रमून (१.९८), रुसणं आहे - रुसेउ (१.९५), प्राप्त करणं, मिळवणं या अर्थी पावणं आहे - पाउम (२.३९), उल्लावो हे बोलणं, संभाषण करणं या अर्थी आहे (५.१४) तर कर्कश - कक्खड बोलणं - बोल्लम ही आहे (१.८१) दीससी - दिसतोस असा सरळ उपयोग आहे (४.८९), दाखवणं आहे - दावेई - दाखवत (३.१५) दावणं असा शब्द आजही कितीतरी लोक वापरतात. फुंकर घालणं आहे - फुक्कन्तो (१.७६), बुज्जिउ - जाणूनबुजून (७.२) मळणं या अर्थी मर्दन करणं या अर्थी आलंय मलेसि (४.४४) आजही आपण पीठ मळतोच; काढणं आहे - कड्ढेइ (४.३५), कड्ढण - कर्षण (३.२४), ओघळणं ओसरणं आहे - ओसरइ (१.७४), झिजणं आहे झिज्जए (२.४१), मोडून पडणं आहे - भज्जिहिसी - मोडून पडशील, (२.२), मोडणं आहे - मोडिअ - नासधूस (५.४९), अमोडिऊण - मोडून, पिरगाळून, भाजणं आहे - भज्जिआ (५.५७), खंतावणं आहे - तम्मइ (४.८३), तमणं, तमत बसणं असा शब्दप्रयोग आजही खेड्यातून आढळतो. मा तम्म (८.४५), खंतावू नकोस. कोळपून जाणं आहे - कुलुत्रिऊण कोळपून, (४.२७), नष्ट होणं आहे - णासइ (२.७२), चुकणं दोन प्रकारे आढळलं : चुक्कसि - चुकलीस, मुकलीस (४.६५), चुक्कसंकेआ - जिचा संकेत चुकला आहे (३.१८), ओलं होणं आहे - ओलिज्जन्त (६.२१), त्याचप्रमाणे टुणटुणणंही आहे. टुणटुणन्तो म्हणजे उड्या मारतो, भटकतो (९.७८), शिवशिवणंही आहे ! - चुलचुलन्ते (४.८१).

काही शब्द वेगळेच आहेत, थोडे गोंधळात टाकणारे हे शब्द पहा :

चिउर - केस (२.७३), वराई - बिचारी हा शब्द अनेक ठिकाणी आला आहे. कण्डुज्जुआ वराई - बिचारी सरळ सोट अशी (३.५२), घेप्पइ - आपलेसे होणे (२.८६), किच्छेन - कष्टाने (७.९४), अवउहणस्स - आलिंगनरूपी (३.४४),

दुद्दोली - निरगाठ (२.४९), कसवट्ट - कसोटी (६.२६), उच्चइ - उचलणे वेचणे (२.५९), काएहि खज्जन्ति - कावळेच खातात (२.४८), धम्मिल्लो - वेणी (५.४४).

काही शब्द साधे वाटतील असे देखील आहेत :

नाऽअ - नाटक (१.६८), महग्घम - महाग (१.६८), आईप्पणेण - पिठाच्या पाण्याने - आलेपन, (१.६६), झत्ति - झटकन (१.६८), सोणार - सोनार (१.९१), मालारी - माळीण (५.९६), हट्ट - बाजार (७.८७), ओआसो - आवास (९.४७), वई - कुंपण (५.६३), गभहर - गाभारा (७.६५), माहप्पो - मोठेपण (२.६६), खन्ध - खांदा (१.७७), भिउडि - भुवई (९.१४), भुमआ भङ्ग - भुकुटिभंग (९.१३), थणाणं - स्तन - खेड्यात आजही थान शब्द वापरतात (१.१००), भरिअ भरून आलेले (डोळे) (२.८०), पहणुअई - पान्हावती (४.४९), अच्छीसु - डोळ्यात (२.३२), पक्कलो - प्रवीर, निधड्या छातीचा (२.१८), पउत्थो - प्रोशित प्रवासी (२.२९), पामर (२.६४), अप्पाणो - आपल्याला स्वत:ला (२.३३), मा छिवसु - शिवू नकोस (१.९२), पअपरिपाटी - पावलांनी घातलेल्या येरझाऱ्या (२.४९), छल्लि - साल (२.१५), खुत्त - रुतलेले (२.७६), लग्गन्ति - लागतात (४.२८), धुव्वन्त - धुतलेले (५.६३), णच्चरी - नाचरी (४.२०), सिढिले - ढिले (३.२४), सहज्झिआ - शेजारीण (८.४१) पाहुणिआ - पाहुणी (९.५६), पङ्गुरणं - पांघरूण (७.७५), कञ्जिएण - कांजीने (२.८६), चंदनपंको - चंदनाची उटी (२.८८), सद्धालुई - श्रद्धाळू, आवड निर्माण झालेल्या (४.१५), कल्लि - उद्या. खेड्यात आजही कल हा शब्द उद्या म्हणून वापरला जातो (५.२), अइआअरेण - अतिआदराने, असोशीने (५.१९), किणे चिठ्ठसि (तिष्ठसि) - का उभी आहेस ?, थोअं थोअं - थोडे थोडे किंवा हळूहळू (५.५०), विशेष म्हणजे, होइ होउ - होईल ते होऊं दे ! (५.२९).

हे असं बरंच काही या गाथांमधून आढळतंच; पण खूपच विलोभनीय आहे या गाथांमधून, तेव्हाच्या मराठीतून प्रकट होणारं तेव्हाच्या मराठी निसर्गाचं चित्र ! (४.९१) मधे ज्योत्स्नाजल प्रकटतं, पंसुआण (पंशुक) म्हणजे नरपोपट विहरतात (५.६२) मधे, कन्दोट्ट फुलतंय (६.२२) मधे. नील कमल, तर (६.४) मधे कमळांची शोभा घमघमून सारं जग जिंकते आहे. महम्महई - घमघमते, ६.१ मधे एक्कक्कं परिरक्षण एकमेकांचे रक्षण करणारे कुरङ्गमिहुन म्हणजे हरणांचं जोडपं भेटतं. (१.७५) मधे दरिअसीह म्हणजे बेफाम झालेला सिंह आहे. मुङकुस म्हणजे मुंगूस दिसते ७.७४ मधे. कइत्थ - कवठ ६.४१ मधे तउसी - काकडीची वेल ५.३४ मधे. मालू - बेलफळ

५.७९ मधे तर <u>गुटिका धनु</u> - कदंब घुटिका - कदंबाचे गेंद फेकण्याच्या धनुचा उल्लेख आढळतो १.७७ मधे. <u>विज्जुज्जोओ</u> - विजेचा झोत झळकतोय ३.१५ मधे तर <u>लंकालता</u> या पिवळसर लाल पळसांच्या नाजूक फांद्या झुलतायत ३.११ मधे आणि ४.४६ मधे तर <u>अद्धप्पइया</u>, अर्धवट, किंचित उडणारी परी दिसते. <u>णइकच्छ</u> - नदीकाठ ४.१६त दिसतो. <u>पाऊसआल</u> - पाऊस काळ ३.९५ मधे आलेला दिसतो. गावातल्या तळ्यात कोणी तरी आभाळ उताणे (<u>उत्ताण</u>) टाकून दिले असल्याची भन्नाट कल्पना २.१० मधे आली आहे ! दैनंदिन व्यवहारातला घरगुती ओलावा ६.३७ मधे आढळतो; तर परिमलिआ गोवेण तेण हत्थं पिजाण ओल्लेइ । स च्चिअ धेणू एहिं पेच्छसु कुड दोहिणी जाआ ॥ = (पूर्वीच्या) गवळ्याने (गाय) अशा रीतीने हाताळली की ती हातदेखील ओलावी ना - (- मग दूध देणं तर दूरच !) पण बघा, आता तीच गाय घागरभर दूध देणारी झाली आहे. तर ९.४६ मधे निसर्ग सौंदर्याची खास बहार आढळून येते :

हंसाणं सरेहिं सिरी सारिज्जइ अह सराणं हंसेहिम् । अण्णोणं चिअ एए अप्पाणं णवर गरुअन्ति । = हंसांचे सौंदर्य सरोवरांनी आणि सरोवरांची शोभा हंसांनी वृद्धिंगत होते. हे दोन्ही एकमेकांचा व स्वत:चाच गौरव करतात !

इथेच थांबून राहावं वाटतंय, नाही का ?

■

ए-1/4, शरयू सरिता नगरी, फेज-2, सिंहगड मार्ग, पुणे 411038.
दूरभाष : (020) 24251353

**<u>श्रद्धांजली</u>**

१. मराठी नाटकातील नवतेचे प्रवर्तक नाटककार, एकांकिकाकार, पटकथालेखक, कथाकार, पत्रकार, नाटक व चित्रपटांचे समीक्षक व समाजचिंतक **विजय तेंडुलकर** यांचे १९ मे २००८ रोजी देहावसान झाले. त्यांना 'भाषा आणि जीवन'तर्फे श्रद्धांजली.

२. मराठी नवकथेचे निर्माते व भाष्यकार, समीक्षक, विनोदकार, कादंबरीकार, नाटक-एकांकिकांचे लेखक, अर्थविषयक विवेचन-लेखक, ग्राहक चळवळीचे पुरस्कर्ते व मार्गदर्शक, साहित्य अकादमीचे माजी उपाध्यक्ष, अ.भा.मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष **गंगाधर गाडगीळ** १५ सप्टेंबर २००८ रोजी कालवश झाले. त्यांना परिषदेतर्फे व 'भाषा आणि जीवन'तर्फे श्रद्धांजली.

३. 'मराठी अभ्यास परिषदे'चे एक आजीव सदस्य **सु. ज्ञा. लद्दू** यांचे ९ सप्टेंबर २००८ रोजी दु:खद निधन झाले. त्यांना परिषदेतर्फे श्रद्धांजली.

# 'छंदोरचने'च्या भाषांतराची निकड

शुभांगी पातुरकर

डॉ. माधवराव पटवर्धन यांचा 'छंदोरचना' हा ग्रंथ १९३७ साली प्रकाशित झाला. छंद हे पद्याचे आवश्यक अंग आहे. या छंदाचे नियमन करणाऱ्या छंदःशास्त्राचा प्राचीन आणि संपन्न वारसा आपल्याला लाभलेला असला तरी 'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना' हा सिद्धांत डॉ. पटवर्धन यांनी मांडला आणि समग्र पद्यरचनेला लावून दाखविला. त्यामुळे छंदःशास्त्राच्या पारंपरिक अभ्यासाला एक नवी दिशा आणि एक नवे परिमाण मिळाले. छंदःशास्त्राच्या विकासाला ही बाब उपकारक ठरली. त्यांनी अभ्यासिलेल्या त्रिविध प्रकारच्या छंदोरचनांपैकी अक्षरछंद वगळता उर्वरित (१) अक्षरगणवृत्ते व (२) मात्रावृत्ते व जाति या मुळात संस्कृतातील छंदोरचना असल्यामुळे त्यांचा प्रसार भारतवर्षात झालेला आहे. भारतभरातील प्रादेशिक भाषांमध्ये या वृत्तांचा-जातिरचनांचा आढळ होत असल्याचे दिसून येते. तेव्हा डॉ. पटवर्धनांचा लयविषयक सिद्धांत या भाषांतील पद्यरचनांना देखील लागू आहेच. जसे मूळ संस्कृत 'शार्दूलविक्रीडित' वृत्त मराठीत जसेच्या तसे आल्याने त्यातील गण-याति-मात्रा मराठी भाषेतही संस्कृतप्रमाणेच लागू असल्याचे आपल्या नित्य परिचयाचे आहेच. तेव्हा अशा मूलभूत स्वरूपाचे लयतत्त्व पद्यरचनांना लावून दाखविणारा 'छंदोरचने'सारखा ग्रंथ प्रकाशित होऊनही त्यातील विचारांची पाहिजे तशी दखल इतर भाषांतील छंदःशास्त्रकारांनी घेतलेली दिसत नाही. असे समजण्याचे एक कारण म्हणजे कोलकाता येथील आशुतोष महाविद्यालयातील इंग्रजीचे प्राध्यापक डॉ. अमूल्यधन मुखर्जी यांनी लिहिलेला ''संस्कृतमधील छन्दांचा एका नवीन दृष्टिकोणातून अभ्यास'' या शीर्षकाचा लेख. प्रस्तुत लेखाचा अनुवाद डॉ. पु.द. नवाथे यांनी केला असून तो ''प्राचीन भारतीय विद्येचे पुनर्दर्शन'' या नावाने प्रकाशित केलेल्या वेदशास्त्रोत्तेजक सभा शताब्दी स्मारक ग्रंथात समाविष्ट करण्यात आला आहे.

आपल्या या लेखात त्यांनी मांडलेले छंदोविषयक विचार, डॉ. पटवर्धन यांच्या एतद्‌विषयक विचारांशी मिळतेजुळते आहेत हे त्यांच्या पुढील विवेचनावरून लक्षात येईल. डॉ. अमूल्यधन मुखर्जींच्या प्रतिपादनातील मुद्दे असे आहेत :-

(१) भारतीय वाङ्मयाच्या इतिहासात अगदी प्राचीन काळापासून छन्द अथवा वृत्त या विषयाला पंडितांच्या अभ्यासात महत्त्वाचे स्थान असले तरी खेदाची बाब अशी की संस्कृत काव्यातून योजिलेल्या छन्दांचे शास्त्रीय अथवा पद्धतशीर रीतीने विवेचन करण्याच्या दिशेने फारच थोडी प्रगती झाली.

(२) छंदाच्या नमुन्यांचे असंख्य प्रकार संकलित करणारे ग्रंथ तयार झाले असले तरी छंद:शास्त्रकारांनी छंदाच्या लयविषयक अंगाविषयी काहीच विचार केला नाही.

(३) एखाद्या पद्यातील अक्षरांची संख्या तसेच त्यातील लघुगुरूंचा विशिष्ट क्रम, यासारख्या केवळ बाह्य अथवा वरवरच्या बाबींकडेच त्यांनी लक्ष पुरविले.

(४) परिणामी छंदाच्या लयतत्त्वमूलक वैशिष्ट्यांवर आधारलेले योग्य असे वर्गीकरण होऊ शकले नाही.

(५) अत्यंत भिन्न अशा लयतत्त्वविषयक वैशिष्ट्यांनी युक्त अशी वृत्ते एका गटात घुसडली गेली आणि याच्या उलट एकाच गटात मोडणाऱ्या वृत्तप्रकारांमध्ये असणारे साम्य क्वचितच ओळखले गेले.

(६) तेव्हा ऐतिहासिक दृष्टीचा मागमूसही नव्हता, तसेच विकसनाची प्रक्रिया अथवा तत्संबद्ध इतर घटक यांची जाणीवही अभावानेच होती.

(७) वृत्ताच्या बांधणीच्या मागे यति आणि लयबद्धता यांचा काही परस्परसंबंध आहे, या गोष्टीचा छडा लावण्याच्या दृष्टीने जुने शास्त्रकार अयशस्वी ठरले.

(८) परिणामी पद्यरचनेत उघड उघड दिसणाऱ्या लयबद्धतेच्या वैशिष्ट्यांचे आकलन त्यांना झाले नाही.

आता डॉ. माधवराव पटवर्धन यांनी आपल्या 'छंदोरचनेत' (पृ. ५६३) व्यक्त केलेले एतद्विषयक विचार बघू.

''छंद:शास्त्राचा गेल्या १५०० हून अधिक वर्षांचा इतिहास पाहिला की एक प्रकारचे असमाधानच वाटते. पद्य म्हणजे लयबद्ध अक्षरचना होय. या मूलभूत सिद्धांताच्या जवळजवळ छंद:शास्त्रकार पुन्हा रुळलेल्या मार्गाने जातात. येऊन छंद:शास्त्राची पुनर्घटना करण्याचा कोणी प्रयत्न करीत नाही. कोणी थोडी वृत्ते देतो, कोणी पुष्कळ वृत्ते देतो. लक्षण सांगण्याची कोणी त्रिकावलंबी (=त्र्यक्षरी गण-पद्धती) पद्धत घेतो तर कोणी विशिष्ट परिभाषा निर्माण करून त्या भाषेने सांगतो, यापलीकडे त्यांच्या कृतीत भेद नाही. कोणी दुसऱ्यांनी रचिलेली उदाहरणे देतात. कोणी ती स्वत: रचून घालतात. पण वाङ्मयाचे मंथन करून छंद:प्रकार कसे परिणत होत आले याचे विवेचन कोणी करीत नाही. आधार देण्याची बुद्धी तर कोणालाच होत नाही. ज्या

सामग्रीवरून एखादा सिद्धांत ठरवायचा वा दुसऱ्याचा सिद्धांत पारखायचा तीच पुढे नसल्याने त्या सिद्धांताची चर्चा होऊ शकत नाही.''

या दोन्ही छंद:शास्त्रकारांच्या वरील विवेचनावरून त्यांच्यात (१) प्राचीन छंद:शास्त्रकारांनी छंदाचे शास्त्रीय वा पद्धतशीर विवेचन न करता केवळ बाह्य व वरवरच्या बाबींकडेच लक्ष पुरविले व (२) लयबद्धता हेच छंदाचे मूलतत्त्व आहे आणि या लयतत्त्वमूलक वैशिष्ट्यावर पद्याचे वर्गीकरण व्हावयास हवे - या दोन मुख्य मुद्यांबाबत असलेली एकवाक्यता लक्षात येते. मात्र महत्त्वाचा मुद्दा असा आहे की डॉ. पटवर्धनांनी आपल्या 'छंदोरचने'त छंद:शास्त्रात आजवर चालत आलेल्या कुंठितावस्थेवर जसे नेमके बोट ठेवले तसेच त्याची भरभक्कम अशा सैद्धांतिक बैठकीवर उभारणी करून त्याच्या प्रगतीच्या चाकाला दिशा आणि गतीही दिली. या त्यांच्या १९३७ साली केलेल्या कार्याची नोंद मात्र १९७८ साली प्रकाशित झालेल्या डॉ. मुखर्जी यांच्या प्रस्तुतच्या लेखातून घेतली गेलेली दिसत नाही. वास्तविक पूर्वसूरींचे ऋण मान्य करणाऱ्या व छंदोविषयक विवेचनात मोलाची भर घालणाऱ्या छंद:शास्त्रकारांना त्यांनी त्यांचे श्रेय दिलेले आहे असे या त्यांच्या लेखातून जाणवते. तेव्हा डॉ. माधवराव पटवर्धनांचा या संदर्भात उल्लेख नसल्याचे कारण सकृतदर्शनी तरी असे असावे की भाषांतराअभावी मराठी भाषेतील हा मोलाचा छंद:शास्त्रीय ग्रंथ बंगाली भाषकांना अपरिचित राहिला असावा. अन्यथा आपला समानधर्मा भेटल्याची खूण त्यांना पटली असती आणि छंद:शास्त्रीय अभ्यासाला मिळालेली गती बघून वाटलेला आनंदही त्यांनी आपल्या या लेखातून व्यक्त केला असता.

पूर्वी शास्त्रकारांची भाषा संस्कृत होती आणि तत्कालीन विद्वानांना, पंडितांना ती अवगत असल्याने त्यातील ज्ञानाचा प्रसार अखिल भारतीय पातळीवर होणे शक्य होत असे. आज प्रादेशिक भाषेत तयार झालेले हे मोलाचे विचारधन भाषिक अडथळ्यामुळे कदाचित योग्य व्यक्तींपर्यंत पोहोचत नसावे. तेव्हा अशा मौलिक ग्रंथांच्या भाषांतराची निकड या निमित्ताने जाणवते हे खरे !

डॉ. मुखर्ज़ी यांनी छंदोविषयक काही मुद्द्यांबाबत डॉ. पटवर्धन यांच्यापेक्षा वेगळा विचारही मांडला आहे. त्यावरही साधक-बाधक चर्चा होणे आवश्यक आहे. या मतभिन्नता नोंदविणाऱ्या मुद्द्यांबाबत मात्र स्वतंत्रच लेख लिहावा लागणार आहे.

[डॉ. अमूल्यधन मुखर्जी यांचे हे छंदोविषयक विचारधन बंगाली भाषेतून मराठीत आणल्याबद्दल डॉ. पु.द. नवाथे यांचे आभार.] ■

11/B-21, सरकारी वसाहत, हाजी अली, मुंबई 400034.
दूरभाष : 9870311534

# आधुनिक समीक्षा सिद्धान्त

अविनाश सप्रे

[ परीक्षित पुस्तक : 'आधुनिक समीक्षा सिद्धान्त' - मिलिंद मालशे, अशोक जोशी. मौज प्रकाशन, मुंबई. २००७. पृष्ठे ३५२. किंमत रु. २७५/- ]

अर्वाचीन मराठी साहित्य समीक्षेमध्ये पाश्चात्य तत्त्वमीमांसा, वादसंकल्पना आणि अनेक संज्ञांचा सढळपणे वापर होत आला आहे. मात्र सन्माननीय अपवाद वगळता, हा वापर नेमकेपणाने, मुळाबरहुकूम, काटेकोरपणे न होता सैलपणे आणि खूपसा बेजबाबदारपणे होत आला आहे आणि त्याला मूलार्थाची प्रतिष्ठाही लाभत आली आहे. असे विपरीत आणि चुकीचे अर्थ प्रस्थापित होऊ नयेत असे वाटत असेल तर अशा लेखनाचे मुळातूनच ज्यांनी व्यवस्थित वाचन केले आहे आणि ज्यांना ते कळले आहे, अशा अभ्यासकांनी मराठीतून त्या त्या विषयावरचे लेखन करायला हवे. इंग्रजी भाषा आणि साहित्यासह पाश्चात्य तत्त्वविचारांचा सखोल अभ्यास आणि ज्ञान असणाऱ्या मिलिंद मालशे आणि अशोक जोशी यांनी लिहिलेल्या आणि मुंबई विद्यापीठ व मौज प्रकाशन यांनी संयुक्तरीत्या प्रकाशित केलेल्या 'आधुनिक समीक्षा सिद्धान्त', या ग्रंथाचे मोल आणि महत्त्व म्हणूनच लक्षणीय स्वरूपाचे आहे.

प्लेटो/अरिस्टॉटलपासून ते रूसोपर्यंतच्या (१९ व्या शतकापर्यंत) पाश्चात्य साहित्यविचारावर अभिजातवाद आणि स्वच्छंदतावाद यांचा प्रभाव होता. त्या अनुषंगाने साहित्याचा हेतू, आस्वाद आणि निर्मिति-प्रक्रिया, 'अनुकृती सिद्धान्त', 'पुनर्निर्मिती सिद्धान्त' , 'कल्पनाशक्ती', 'काव्यभाषा' अशा सिद्धान्तांचा, संकल्पनांचा समीक्षेत सढळपणे विचार होत होता. पुढे विसाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत या समीक्षेवर 'आधुनिकता'वादाचा प्रभाव राहिला. रूपवाद, प्रतीकवाद, आविष्कारवाद, प्रतिमावाद, वास्तववाद, अतिवास्तववाद, अस्तित्ववाद, फ्रॉईड आणि मार्क्सचे विचार आणि त्यातून निर्माण झालेले मनोविश्लेषण आणि बिंब-प्रतिबिंबवाद, प्रयोगशीलता, कलेची स्वायत्तता, मौलिकता, 'कलेकरिता कला' व्यक्तिवाद, इ० सिद्धान्त, संकल्पना, आणि परिभाषा या प्रभावातून निर्माण झाली. मात्र सर्वसाधारणपणे १९६० नंतर 'उत्तर-आधुनिकता' आणि 'उत्तर-संरचना'वादांचा प्रभाव निर्माण झाला आणि या

प्रभावाखाली आजवरच्या अनेक संकल्पनांना आणि गृहीतकांना जबरदस्त धक्के देण्यात आले. या काळातील तत्त्वविचारांच्या केंद्रस्थानी भाषावैज्ञानिक संकल्पनांना महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले; साहित्य ही स्वायत्त बाब नसून संस्कृतीचा एक आविष्कार आहे, या भूमिकेचा पुरस्कार होऊ लागला आणि साहित्यसमीक्षेचे स्वरूप आंतरविद्याशाखीय बनले. चिन्हात्मकता, विकेंद्रितता, सांस्कृतिक भौतिकवाद, लिंगभेद विचार, अर्थनिर्णयन, संभाषिते, संहितात्मकता, पाया विरोध, विचारतत्त्व विरोध (अँटी-लोगो), सारभूतता-विरोध (अँटी-इसेन्शिॲलिझम), महाकथन-विरोध (अँटी-ग्रँडनॅरेटीव्हज्), भेद, बहुतत्त्ववाद, स्त्रीवाद, वाचकवाद नवइतिहासवाद इ० नव्या संकल्पना, संज्ञा आणि त्यांच्या परिभाषा अस्तित्वात आल्या. हे सर्व मराठी समीक्षेला नवे, अपरिचित असल्याने गोंधळात टाकणारे होते आणि अजूनही आहे. मात्र या साऱ्याचा वापर आता होऊही लागला आहे. हा वापर नेमकेपणाने होणे अतिशय गरजेचे आहे. त्यासाठी 'आधुनिक समीक्षा सिद्धान्त' हा ग्रंथ मार्गदर्शक ठरणारा आहे.

एकूण दहा प्रकरणांतून आस्वाद-समीक्षा-सिद्धान्त, आधुनिकता-उत्तर-आधुनिकता, रूपवाद आणि स्वायत्तता, संरचनावाद आणि चिन्हात्मकता, उत्तर - संरचनावाद आणि विकेंद्रिता, मार्क्सवाद आणि सामाजिकता, मनोविश्लेषण वाद आणि अबोधता, स्त्रीवाद आणि लिंगभेद, वाचकवाद आणि अर्थनिर्णयन, नव-इतिहासवाद, उत्तर-वसाहतवाद आणि संस्कृतिसमीक्षा इ०ची सविस्तर मांडणी, चिकित्सा आणि विवेचन करण्यात आले आहे. विषय-मांडणीचे स्वरूप निव्वळ संकलनात्मक नसून अन्वयार्थक स्वरूपाचे आहे. ग्रंथाच्या शेवटी मराठी/इंग्रजी ग्रंथांची/लेखांची संदर्भसूची आणि विषयसूची देण्यात आली आहे. विवेचनात आलेल्या वादांची, संकल्पनांची, तत्त्वांची, संज्ञांची आणि परिभाषांची ऐतिहासिक, सांस्कृतिक आणि तात्त्विक पार्श्वभूमी देण्यात आली आहे. जिथे जिथे मूळ भूमिकेशी मतभेद वा शंका वाटतात, तिथे तिथे तशी नोंद स्पष्टपणे करण्यात आली आहे. एकूण सर्वच विवेचन लेखकद्वयाच्या सखोल अभ्यासाचे, नेमक्या आकलनाचे आणि शास्त्रशुद्ध मांडणीचे दर्शन घडविणारे आहे. समकालीन मराठी समीक्षा त्याच त्याच भूमिकांच्या आणि वादांच्या आवर्तात सापडलेली दिसते. त्यामुळे अनेक समीक्षक अनेक विषयांवर लिहीत असले तरी त्यातून फारसे काही नवीन, मूलभूत स्वरूपाचे आणि म्हणून पुनर्विचार करायला लावणारे हाती लागत नाही; मतमतांचा उथळ खळखळाटच ऐकायला मिळतो. प्रस्तुत ग्रंथामधे आधुनिकोत्तर काळातील ज्या विविध भूमिकांचा ऊहापोह करण्यात आला आहे, त्यांतील वेगवेगळ्या संकल्पनांचे उपयोजन मराठी समीक्षेमधून केले तर या कोंडीतून बाहेर पडून अर्थांच्या नवनवीन खुणा अधारेखित करता येतील; साहित्य संस्कृतीकडे बघण्याची नवी दृष्टी

प्राप्त होईल. प्रस्तुत ग्रंथातील विषय बहुसंख्य अभ्यासकांना तसे अपरिचित, गुंतागुंतीचे आणि व्यामिश्र स्वरूपाचे असले तरी त्यांचे विवेचन आकलनसुलभ व्हावे अशा पद्धतीने करण्यात आले आहे, हा या ग्रंथाचा खास विशेष होय.

आधुनिक समीक्षा सिद्धांतांमधे रूपवाद आणि मार्क्सवाद यांची कामगिरी महत्त्वाची मानली जाते. साहित्याचा विचार केवळ तथ्यलक्षी आणि वर्णनात्मक करून त्याच्या हेतूवर लक्ष केंद्रित करणाऱ्या पारंपरिक विचारातून समीक्षेला बाहेर काढून तिच्या केंद्रस्थानी सौंदर्यविचार आणण्याचे कार्य रूपवादी भूमिकेने केले. त्यासाठी तिने 'कलेची स्वायत्तता' आणि 'वस्तुनिष्ठता', कलेचे रूप आणि अनन्यसाधारणत्व या तत्त्वांचा पुरस्कार केला. रूपवादावरील प्रकरणात यामागची ऐतिहासिक पार्श्वभूमी, तात्त्विकविचार, साहित्यविचार, सैद्धांतिक भूमिका आणि उपयोजित समीक्षाविचार यांचा सविस्तर ऊहापोह केला आहे, पुढच्या टप्प्यावर रूपवादी भूमिकेचे खंडन 'संरचनावादा'ने केले आणि समीक्षाविचारात नव्या भूमिकांची भर घातली. रूपवादाच्या विरुद्ध टोकावर उभ्या असलेल्या मार्क्सवादाने कलेतील सामाजिकतेचा पुरस्कार केला. प्रस्तुत ग्रंथात मार्क्सवादी साहित्यविचारांची पारंपरिक मांडणी कशी आहे, याची चिकित्सा आली आहेच; पण पुढे या भूमिकेला 'उत्तर-आधुनिकतावादाने' दिलेल्या आव्हानानंतर मार्क्सवादाची पुनर्मांडणी नवमार्क्सवाद्यांनी कशी केली आहे तेही दाखवून देण्यात आले आहे. फ्रँकफर्ट प्रणाली, गोल्डमान, फ्रेड्रिक जेमसन, टेरी ईगल्टन, अल्थ्यूजर, नाटककार ब्रेश्ट, ग्राम्ची, इ० विचारवंतांनी मार्क्सवादाचा गाभा कायम ठेवून केलेल्या नव्या-मांडणीची आणि अन्वयार्थांची या ग्रंथातील चिकित्सा - लक्षणीय स्वरूपाची आहे. या विवेचनाच्या शेवटी मराठीतील मार्क्सवादी समीक्षेचा आढावा घेण्यात आला आहे, तो पाहता मराठी मार्क्सवादी समीक्षा मार्क्सवादाच्या पारंपरिक टप्प्यावरच थांबलेली दिसून येते. मार्क्सवाद आता संपला असून मार्क्सवादी समीक्षा आता अनावश्यक आहे, अशी इथल्या प्रतिष्ठित विचारवंतांची आणि समीक्षकांची भूमिका दिसते. मात्र, मार्क्सवादी समीक्षा अजूनही नव्या संदर्भात प्रस्तुत आहे हे पाश्चात्य नवमार्क्सवाद्यांनी दाखवलेल्या चिकित्सेच्या आधारे म्हणता येते. दुर्दैवाने असे प्रयत्न मराठी समीक्षेत होताना दिसत नाहीत. रूपवादावरील प्रकरणाच्या शेवटीही मराठीतील रूपवादी समीक्षकांचा आणि त्यांच्या लेखनाचा उल्लेख आला आहे; पण तो त्रोटक स्वरूपाचा आहे, तो आणखी सविस्तर यायला हवा होता, म्हणजे मग मराठीतील नवसाहित्याच्या टप्प्यावर आणि नंतरही टेंभा मिरवलेली तथाकथित रूपवादी समीक्षा कशी उथळ आणि फुटकळ स्वरूपाची आहे हे लक्षात आले असते.

संरचनावादाने भाषेला एकूणच तात्त्विक मीमांसांच्या केंद्रस्थानी आणले आणि

भाषेचे सार्वभौमत्व प्रस्थापित करण्याचा महत्त्वाकांक्षी प्रकल्प सुरू केला. फेर्दिनां द सोस्यूरचे भाषाविषयक विवेचन या दृष्टीने पथदर्शक ठरले. भाषाविज्ञानाला अनन्य-साधारण महत्त्व प्राप्त झाले. चिन्हमीमांसा महत्त्वाची ठरू लागली. लेवी स्ट्रॉसने मानववंशशास्त्र आणि सामाजिक सांस्कृतिक संकेत पद्धतींचा अभ्यास करताना, रोलां बार्थने संस्कृतीमधील चिन्हात्मकता तपासताना, लाकाने मनोविश्लेषणात, विशेषत: नेणीवेची रचना तपासताना, फुकोने इतिहास आणि पुरातत्त्वांचा शोध घेताना संरचनावादाचा आधार घेतला. पुढे उत्तर-संरचनावादाच्या टप्प्यावर संरचनावादातील काही तत्त्वे नाकारण्यात आली (उदा० संकेतव्यवस्थेचे सार्वकालिक/सार्वदेशिक स्वरूप, चिन्हीकरणातील अर्थाची स्थिरता, द्विपदी भूमिका, संरचनांतील साम्ये इ०) आणि त्यातून झॅक देरीदाचा 'विरचनावाद' पुढे आला. विरचनावादाने अर्थनिर्णयनातील अनिश्चितता आणि अस्थैर्य दाखवून दिले, ज्ञानकेंद्रित्व, ध्वनिकेंद्रित्व, द्विपदी आकलन नाकारले. उत्तर-संरचनावादी अभ्यासक आणि ल्योतार्द, फुको इ० अन्य विचारवंतांच्या वैचारिक मांडणीतून उत्तर-आधुनिकतावादाची भूमिका साकार झाली. पाश्चात्य तत्त्वज्ञानामध्ये प्लेटोपासून चालत आलेल्या बुद्धीच्या (रीझन) केंद्रवर्ती परंपरेला रूसो, हायडेगर फ्रॉईड आणि मोठ्या प्रमाणात नित्शेने आव्हान दिले होतेच. त्य. त्रा प्रभाव व संस्कार घेऊन उत्तर-आधुनिकतावादाच्या रूपाने हे 'अँटी-रीझन' आव्हान व्यापक प्रमाणात प्रकट झाले. प्रस्तुत ग्रंथातील यासंबंधीचे विवेचन अत्यंत महत्त्वाचे आणि गाभ्याचे आहे. उत्तर-आधुनिकतावादाच्या पर्यावरणातून उत्तर-वसाहतवाद, स्त्रीवाद, नवइतिहासवाद, वाचकवाद आणि संस्कृतिवाद अशा नव्या संकल्पना पुढे आल्या; त्यांचेही सविस्तर विवेचन प्रस्तुत ग्रंथात नेमकेपणाने करण्यात आले आहे. उत्तर-आधुनिकतावादाने युरोपच्या इतिहासातील 'नवजीवनाच्या' (रनेसां) कालखंडापासून ते मार्क्सवादापर्यंतच्या मानवकल्याणाच्या 'प्रगती', 'बुद्धिवाद', 'आशावाद', 'वैज्ञानिक सत्य', 'मानवतावाद', 'विज्ञानाची वस्तुनिष्ठता व तटस्थता', 'महाकथने', 'इतिहासाची सलगता', 'सौंदर्यशास्त्र', 'नैतिकता' अशा अनेक संकल्पना नाकारल्या, आणि काळाच्या ओघातले त्यांचे वैयर्थ्य दाखवण्याचा प्रयत्न केला, यासंबंधीचे विवेचनही या ग्रंथात आले आहे. उत्तर-आधुनिकतावादाने 'आधुनिकता'वाद नाकारला, त्याचे खंडन हाबरमासने केले आहे आणि 'आधुनिकता' हा महाप्रकल्प अद्यापही अपुरा असून तो अजूनही नव्या काळात महत्त्वाचा आहे असे म्हटले आहे. जेमसने उत्तर-आधुनिकतावाद हा तिसऱ्या टप्प्यावरील भांडवलशाहीचा सांस्कृतिक आवरणातून प्रकट होणारा आविष्कार असून 'बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या' सोयीचे तत्त्वज्ञान आहे असे म्हटले आहे. हे दोन्ही संदर्भ या ग्रंथात आले आहेत, मात्र टेरी ईगल्टनने जेमसनच्या प्रसिद्ध

लेखाला प्रतिसाद म्हणून १९८५ साली 'न्यू लेफ्ट रिव्ह्यू'मधून प्रकाशित केलेल्या 'कॅपिटॅलिझम, मॉडर्नर्निझम अँड पोस्टमॉडर्नर्निझम' या लेखाचा संदर्भ या ग्रंथात आलेला नाही, तो आवश्यक वाटतो; कारण त्यामधून ईगल्टनने जेमसनपेक्षाही वेगळ्या परिप्रेक्ष्यात आणि ठामपणे विरोध नोंदवला आहे. उत्तर-आधुनिकतावादाची स्थापत्यशास्त्र, विज्ञान, राजकारण आणि चित्रपट इ० महत्त्वाच्या क्षेत्रांसंबंधी जी वेगळी भूमिका आहे, आणि तिचे त्या त्या क्षेत्रातले जे आधार आणि संदर्भ आहेत, त्यांचे विवेचन या ग्रंथात नाही. तसेच, 'विचारसरणीचा अंत' (दि एण्ड ऑफ आयडियॉलॉजि), 'मानवाचा अंत' (दि एण्ड ऑफ मॅन), 'इतिहासाचा अंत' (दि एण्ड ऑफ हिस्ट्री), 'वास्तवाचा अंत' (दि एण्ड ऑफ द रियल) अशा ज्या कांही नव्या संकल्पना उत्तर-आधुनिकतावादाने पुढे आणल्या आहेत, त्यांचेही विवेचन या ग्रंथात आलेले नाही. मुख्य म्हणजे, उत्तर-आधुनिकतावादाच्या सर्जनशील निर्मितीसंबंधी (कॉन्सेप्ट ऑफ क्रिएशनसंबंधी) प्रस्थापित विचारापेक्षा संपूर्णपणे वेगळा असा विचार आहे, तो या ग्रंथात आलेला नाही. डलझ (Deleuze) आणि गोत्री (Guattari) यांनी 'अ थाउजंड प्लॅट्व्ज'मधून ह्या विचारांचे विवेचन केले आहे. प्लेटोपासून चालत आलेल्या ज्ञानवृक्षाला त्यांनी वृक्षसमान नमुना (आर्बरेसंट मॉडेल) असे म्हटले असून हा वृक्ष, त्याच्या फांद्या आणि मुळांसह आपल्या डोक्यातून आपण प्रथम काढून टाकायला हवा, म्हणजे निर्मितीची नवी संकल्पना रुजवता येईल असे त्यांना ठामपणे वाटते. 'झाडा'च्या ऐवजी हा पर्याय ते रिझोमे (रिझोमे : गवतासारखी कुठलीही वनस्पती)च्या रूपात विशद करतात. झाडाचे वेगवेगळे भाग दाखवता येतात, रिझोमे-सारख्या वनस्पतीची आतली मुळे आणि वरचा विस्तार सुटा सुटा न वाढता एकमेकांत मिसळून क्षितिज समांतर रूपात विस्तीर्णपणे पसरत असतात. त्यांचे सहअस्तित्व गुण्यागोविंदाचे असते. निर्मिती ही अशाच प्रकारे होत असते, असे त्यांना सांगायचे आहे. 'आंतर-संहिता संबंध' किंवा 'लेखकाचा अंत'सारख्या संकल्पनांचा उत्तर-आधुनिकतावादामधे जो विचार आहे, तो या निर्मिति-प्रक्रियेच्या संकल्पनेशी निगडित आहे. निर्मितीप्रमाणेच 'वाचनाचे राजकारण' असते असे ही वादसंकल्पना मानते, त्याचाही विचार प्रस्तुत ग्रंथात करण्यात आलेला नाही. त्या त्या काळामधे साहित्य कशाला म्हणायचे ? साहित्यातील श्रेष्ठ-कनिष्ठ कसे ठरवायचे ? यासंबंधीचे जे मापदंड (कॅनन्स) कार्यरत असतात, ते निर्माण कोण करते ? त्यामागे कशा प्रकारचे 'राजकारण' असते ? कुणाच्या सोयीसाठी ते निर्माण करण्यात येते ? त्यासाठी कशी 'व्यूहरचना' वैचारिक/सांस्कृतिक क्षेत्रामधे निर्माण केली जाते ? अशा काही महत्त्वाच्या प्रश्नांकडे ही नवी समीक्षा आपले लक्ष वेधते. या अनुषंगाने 'मॅन्युफॅक्चरींग कन्सेंट'

ही संकल्पना कशी पद्धतशीरपणे राबवली जाते हे लक्षात घ्यावे लागते. प्रस्तुत ग्रंथात या संबंधीचे विवेचन आलेले नाही; ते आवश्यक होते असे वाटते.

पारंपरिक विचारसरणीमध्ये साहित्य आणि समीक्षा ही मूलत:च भिन्न क्षेत्रे मानण्यात आली आहेत. या अतिनव समीक्षासिद्धांतांमध्ये त्यांच्यामधे भेद न मानता त्यांना समान दर्जाचे मानले आहे आणि त्यामुळे दोन्हीसाठीही 'संहिता' हा शब्दप्रयोग केला आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या कर्त्यांना ही भूमिका मान्य नाही, मात्र ती 'समजून घेण्याचा' प्रयत्न त्यांनी केला आहे.

या ग्रंथाच्या सुरवातीला 'आस्वाद, समीक्षा आणि सिद्धान्त' हे प्रकरण देण्यात आले आहे. सर्वसाधारणत: कला-आस्वादामधे 'भावना आणि 'विचार' यांना प्रतिद्वंद्वी मानून आस्वादाचा संबंध भावनेशी जोडण्यात येतो. आस्वाद प्रक्रिया अंत:स्फूर्त असते असेही मानण्यात येते. या ग्रंथामधे आस्वादप्रक्रियेतही विचार, संकल्पना, निकष आणि सिद्धांत कसे कार्यरत असतात हे सविस्तरपणे दाखवून दिले आहे. मूल्यमापन हे 'यादृच्छिक' असू नये आणि त्यासाठी निश्चित निकषांची गरज अपरिहार्य आहे असे मानण्याकडे लेखकद्वयाचा कल आहे आणि उत्तर-आधुनिकतावादी समीक्षा-सिद्धान्त मात्र 'यादृच्छिकता' मानणारे आहेत. त्यामुळे ग्रंथाच्या सुरवातीच्या प्रकरणाप्रमाणेच, या नव्या सिद्धांतांची चिकित्सा केल्यानंतर, ग्रंथाच्या शेवटी एका स्वतंत्र प्रकरणातून, एकूणच या समीक्षा-सिद्धांतांनी जे प्रश्न उपस्थित केले आहेत त्यांसंबंधी लेखकद्वयांची भूमिका स्पष्टपणे आणि सविस्तरपणे यायला हवी होती, असे वाटते. ■

58/59, पार्श्वनाथनगर, सांगली-मिरज रस्ता, मु.पो. वानलेसवाडी, मिरज 416414.
दूरभाष : 0233 - 2212720 / 9422041312

## लेखकांसाठी सूचना : ३.

<u>संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच आपल्या लेखात उपयोग करावा :</u> लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक/लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. संदर्भातील सर्व तपशील लिखाणाच्या अखेरीस संदर्भसूचीमध्ये द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशीलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम.

**संदर्भसूची मराठीच्या अकारविल्हे (वर्णक्रमाने) असावी.**

# एक पुस्तक-प्रवासाची कथा

विजया देव

[ परीक्षित पुस्तक : 'माझा प्रवास : १८५७च्या बंडाची हकिगत' - विष्णुभट गोडसे वरसईकर. संपादक : मृणालिनी शहा. राजहंस प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे : २३९. किंमत रु. १७५/- ]

गोडसे भटजींचे 'माझा प्रवास : १८५७ च्या बंडाची हकिगत' हे पुस्तक प्रथम प्रसिद्ध झाले (१ डिसेंबर १९०७) या घटनेला २००७ मध्ये शंभर वर्षे झाली. तसेच १८५७च्या स्वातंत्र्यलढ्यालाही दीडशे वर्षे पूर्ण झाली. हे निमित्त साधून या पुस्तकाची नव्याने संपादित केलेली आवृत्ती नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. हे पुस्तक मराठी साहित्यात आजतागायत गाजते आहे, त्याला अनेक कारणे आहेत. पेण तालुक्यातल्या वरसई गावचे विष्णुशास्त्री गोडसे उत्तर हिंदुस्थानात द्रव्य मिळवण्यासाठी जातात आणि १८५७च्या शिपायांच्या बंडात सापडतात; पुढे त्या अनुभवांवर आधारित प्रवासवृत्त लिहितात, ही घटना इतिहासाचे अभ्यासक, साहित्याचे विमर्शक, सुज्ञ वाचक या सर्वांनाच नवलाईची आणि अभ्यसनीय वाटत आलेली आहे.

भारताचार्य चिं.वि. वैद्य यांच्या आग्रहाने गोडसे भटजींनी हे लेखन केले, ते मुळात मोडी लिपीमध्ये. त्याचे बालबोध नागरीमध्ये लिप्यंतर करून पुस्तक म्हणून ते प्रसिद्ध झाले १९०७ मध्ये. पुढे न.र. फाटक यांनी १९४९ मध्ये स्वत:च्या प्रस्तावनेसह त्याची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध केली (चित्रशाळा प्रकाशन). त्यानंतर दत्तो वामन पोतदारांनी 'माझा प्रवास'ची चौथी आवृत्ती प्रसिद्ध केली (व्हीनस प्रकाशन, पुणे, १९६६, आवृत्ती ८वी २००७). तरीही पुन्हा संपादिका मृणालिनी शहा यांना नव्याने या पुस्तकाचे संपादन करावे असे वाटले; कारण 'शंभर वर्षे एखादे पुस्तक मराठी वाचकांना का आवडावे ?' हा प्रश्न त्यांना पडला आणि त्याची उत्तरे शोधताना हे पुस्तक, त्याचे लेखक, त्यांचा गाव यांची चरित्रे लिहिण्याची प्रेरणा त्यांना मिळाली, मूळ संहिता पुन्हा सादर करावी असे वाटले; त्याचप्रमाणे या पुस्तकाच्या लेखनशैलीचा अभ्यास करणेही त्यांना महत्त्वाचे वाटले.

आपल्या प्रस्तावनेची विभागणी मृणालिनी शहा यांनी विविध उपप्रकरणांमध्ये

केली आहे. त्यात त्यांनी सुरुवातच केली आहे ती या पुस्तकाच्या चरित्राने. मूळ मोडीतील हस्तलिखित व नंतर त्याच्या पुस्तकरूपाने सिद्ध झालेल्या आवृत्त्या यांचा कालक्रमानुसार विवेचक आढावा त्यांनी घेतला आहे. त्यात, प्रत्येक आवृत्तीचे वेगळेपण, त्याबाबतची मतमतांतरे, त्यांची परस्परतुलना यांना स्थान दिले आहे. त्यामुळे या पुस्तकाचा आजतागायत झालेला प्रवास वाचकाच्या नजरेसमोर येतो. याच भागात मोडी लिपीची द.वा. पोतदारांनी दिलेली माहितीही संपादिकेने दिली आहे.

'माझा प्रवास' हे लेखन आत्मवृत्त मानावे की प्रवासलेखन मानावे, की इतिहासकथन हा प्रश्न यापूर्वी अनेकांना पडला होता. त्यामुळे या पुस्तकावर जी परीक्षणे वेळोवेळी लिहिली गेली त्यांचा मागोवा संपादिकेने घेतला आहे. हे पुस्तक १९०७ मध्ये प्रसिद्ध झाले असले तरी त्याचे पहिले परीक्षण मे १९४४ मध्ये 'सह्याद्री'च्या अंकात आलेले आहे ही बाब संपादिकेने येथे लक्षात आणून दिलेली आहे. तसेच 'माझा प्रवास' हे प्रवासवर्णनपर लेखनच असल्याचे स्वत:चे मत वाङ्मयीन संकल्पनांच्या आधारे नि:संदिग्धपणे मांडले आहे.

या अनुषंगाने वाङ्मयेतिहासकारांनी या पुस्तकाची घेतलेली अपुरी दखल, त्याचा अभ्यासक्रमात झालेला समावेश यांची चर्चा मृणालिनी शहा करतात. 'माझा प्रवास'-मधील असाधारण जीवनानुभवामुळे थेट १८८४ पासून अगदी अलीकडच्या काळापर्यंत ('झाशीची राणी लक्ष्मीबाई' या प्रतिभा रानडे यांच्या २००२ मध्ये आलेल्या पुस्तकापर्यंत) अनेक लेखकांवर या पुस्तकाने प्रभाव गाजवला आहे. तसेच याचे हिंदी भाषांतर अमृतलाल नागर यांनी केले आहे, याचा सविस्तर परामर्श त्यांनी नेटकेपणाने घेतलेला आहे.

गोडसे भटजी यांचे गाव वरसई. संपादिकेने या गावाचे भौगोलिक स्थान व ऐतिहासिक महत्त्व सविस्तर विशद करून गावाचे चरित्रच रेखाटले आहे. त्या पाठोपाठ येते गोडसे कुटुंबाचे चरित्र : घराण्याची ही माहिती त्यांनी गोडसे कुलवृत्तांत, न.र. फाटक यांची प्रस्तावना आणि 'माझा प्रवास' यांच्या आधारे लिहिली आहे.

एकूणच 'माझा प्रवास'चा सर्वांगीण परिचय करून द्यायचा या हेतूने मृणालिनी शहा यांनी या सर्व माहितीचा धांडोळा घेतला आहे. मूळ पुस्तकातच इतिहास, ऐकीव माहिती, प्रवासवर्णन, कौटुंबिक तपशील, समाजदर्शन असे विविध पैलू एकवटलेले असल्यामुळे त्यांचा वेगवेगळा परामर्श घेणे संपादिकेने आपले कर्तव्य मानलेले आहे. या दृष्टीने पाहिले असता या उपप्रकरणांची सांधेजोड करत 'माझा प्रवास'चे एक सलग चित्र वाचकाच्या डोळ्यापुढे उभे राहते. 'सांधेजोड' म्हणण्याचे कारण असे की, वरसई गावाचे चरित्र आणि गोडसे कुटुंबीयांचे चरित्र ही दोन उपप्रकरणे वाङ्मयीन परामर्श

घेणाऱ्या भागांच्या शेवटी आली असती तरी चालली असती. पण या निमित्ताने सर्व माहिती एकत्र संकलित झाली हे या पुस्तकाचे फलित आहे.

गोडसे भटजीलिखित संहिता मोडी लिपीत असून ती १९२२ पासून भारत इतिहास संशोधन मंडळाकडे आहे. मंडळासाठी त्याचे लिप्यंतर शंकरराव जोशी यांनी केले. तेच मूळ हस्तलिखित म.म.द.वा. पोतदार यांनी जिज्ञासूंना सादर केले, त्यात कोणतीही काटछाट किंवा गाळसाळ न करता. मृणालिनी शहा यांनी ही पोतदार प्रत स्वीकारलेली नाही, तर भारत इतिहास संशोधन मंडळाकडील मूळ मोडी संहिताप्रत मिळवून नव्याने तिचे लिप्यंतर सुलभा हरके यांच्याकडून करवून घेतले आहे (पृ.६७ - २०२). मग प्रश्न असा येतो की पोतदार प्रत आणि शहा यांनी करून घेतलेले लिप्यंतर या संहितांमध्ये काही फरक आहे का ? वैद्य प्रत, फाटक प्रत आणि राजवाडे प्रत यांची परस्पर तुलना जशी शहा यांनी प्रस्तावनेमध्ये केली आहे तशी, प्रस्तुत प्रतीची तुलना राजवाडे प्रतीशी त्यांनी करणे अपेक्षित होते. त्या दोन्हींमध्ये काही तफावत आहे का, की त्या समरूप आहेत याविषयी त्यांनी मौन बाळगले आहे. मोडीची लेखनपद्धती पाहता - म्हणजे शब्द न तोडता सलग लिहीत जाणे, ऱ्हस्वदीर्घत्व, अनुस्वार क्वचितच देणे, काही शब्दांची संक्षिप्त रूपे करणे, इ० - एकाच संहितेच्या दोन लिप्यंतरांत फरक पडू शकतो. मोडी लिपीमुळे काही शब्द इकडचे तिकडे होतात. (पृ.६१); ''काही शब्द जोडून लिहिल्यामुळे कळत नाही. उदा० पुर्तपणे > पूर्णपणे असे शब्दांचे लेखन बरोबर करून घ्यावे लागते... सर्वांनी > सर्वांनी असे वाचावे लागते. वैद्य किंवा पोतदार प्रतीमध्ये सर्वांनी असेच लिहिले आहे.'' (पृ.६५) असे शहा म्हणतातच. त्यामुळे नव्या लिप्यंतरात शहा यांनी कोणती दृष्टी, कोणते निकष बाळगले आहेत ?

दुसरा मुद्दा इतिहासाचा. गोडसे भटजी द्रव्यार्जनासाठी निघाले ते १८५७ च्या बंडात सापडले. तिथून परत आल्यावर जवळजवळ पंचवीस वर्षांनी त्यांनी त्या आठवणी लिहून काढल्या. त्यामुळे, त्यांत काही ऐतिहासिक तथ्य आहे, काही ऐकीव माहिती आहे आणि प्रवासाच्या मनोरंजक गोष्टीही आहेत. ''जवळजवळ निम्मे पुस्तक इतिहासाने व्यापलेले'' (पृ.७) असल्यामुळे इतिहासाचे साधन म्हणूनही त्याची चिकित्सा होते. पण संपादिकेने ''आपला इतिहास या विषयाशी प्रत्यक्ष संबंध नाही. त्यामुळे इतिहासाच्या दृष्टीने कसलाही अभ्यास या संपादनात नाही'' (पृ.७) अशी कबुली दिली आहे. वास्तविक १८५७च्या बंडाला १५० वर्षे पुरी झाली हे जमेस धरता या पुस्तकातील ऐतिहासिक वास्तवाची शहानिशा संपादिकेने करायला हवी होती असे वाटते. कारण विविध गॅझेटियर्सही तिने वाचली असावीत असे सूची दर्शविते. संपादिकेने

स्वत:ला घालून घेतलेलीही मर्यादा आपण मान्य करू; पण, इतिहासाची दृष्टी बाळगली नाही असे म्हणत असतानाच शहा यांनी वरसई गावाचे, 'माझा प्रवास' या संहितेचे, गोडसे घराण्याचे अशी चरित्रे सादर केली आहेत, तिथे इतिहासाची दृष्टीच बाळगली आहे. हे इतिहास जर इथे येतात तर, प्रत्यक्ष संहितेचा प्राण असलेला इतिहास का दुर्लक्षिला जावा ?

या पुस्तकाचा अभ्यास इतिहासकाराच्या दृष्टीतून केलेला नसून भाषाशैलीच्या दृष्टीने केला आहे असे शहा आवर्जून पुन्हापुन्हा सांगतात. ''गोडसे भटजींनी वापरलेल्या सहज साध्या शैलीचा अभ्यास या प्रस्तावनेमध्ये आहे.'' (पृ.४); ''...आणि मुख्य म्हणजे पुस्तकाच्या लेखनशैलीचा अभ्यास केला आहे.'' (पृ.७); ''भाषाशैलीचा अभ्यास अटळ !'' (उपप्रकरण मथळा, पृ. ५८) असे त्या वारंवार म्हणतात. पण प्रत्यक्षात मात्र हे विवेचन भाषाशैली-अभ्यासाच्या दृष्टीने खूपच उणे आणि भाबडे वाटते. गोडसे भटजींच्या भाषेबद्दल बोलताना, ''साध्या वाक्यरचनेचे सौंदर्य'', ''साधीसुधी वाक्ये'', ''मोठी वाक्ये नाहीत किंवा जोड वाक्येही फारशी येत नाहीत'' (पृ.६२) अशी अत्यंत मोघम विधाने त्या करतात. काही ठिकाणी तर त्यांच्या शैलीविषयक विचारांचा, समजुतींचा गोंधळ त्यांच्या लिहिण्यात प्रतिबिंबित होतो, उदाहरणार्थ,

'' 'बोली' आहे असे जेव्हा आपण म्हणतो, तेव्हा ती भाषा पूर्णपणे बोलीसारखी नसते; पण बोली भाषेची कितीतरी वैशिष्ट्ये तिच्यात आलेली असतात. या लिखित बोलीमध्ये भावनांची अभिव्यक्ती पूर्णपणे होऊ शकते. त्यामुळे या शैलीला कसलेही नाव देता येत नाही, हे खरे.'' (पृ.५९)

यातून काय समजायचे ? मग यातून सोडवणूक करण्यासाठी संपादिका म्हणते,

''... तरी हे पुस्तक वाचताना जी एक वाचनीयता वाचकांना जाणवते, त्यालाच शैली असे म्हणता येते. नाहीतरी आपले मनोगत व्यक्त व्हावे, यासाठी जी भाषा वापरली जाते तिलाच आपण भाषाशैली म्हणत असतो.'' (पृ.५९)

या संदर्भात त्यांनी वापरलेल्या संज्ञाही अचूक नाहीत. ''भाषापद्धती किंवा शैली यांचा विचार करताना त्या लेखनाचा शब्दकोश महत्त्वाचा ठरतो. '' (पृ.५९) या वाक्यात भाषेचा 'शब्दसाठा' असे शहा यांना म्हणायचे असावे.

वास्तविक शैलीविज्ञानाच्या अंगाने भाषाभ्यास करणाऱ्याला 'माझा प्रवास' ही संहिता हा मोठा खजिना आहे. शैलीविज्ञानाशी जुजबी परिचय करून घेतला असता तरी शहा यांना या लेखनाच्या भाषेचे सौंदर्य उलगडून दाखवता आले असते; व वाचकांना त्याचा प्रत्यय देता आला असता. किमान, या गद्यलेखनातील नामपदबंध,

क्रियापदे, विशेषण विस्तार, संवादाची लय ओतप्रोत भरलेले गद्य, निवेदकाचा प्रांजळपणा दर्शवणारी त्याची स्वगतवजा वाक्ये इत्यादींच्या आधारे या गद्याचा अभ्यास करायला भरपूर वाव होता. या विश्लेषणातून त्यांना अर्थ-व्यापारापर्यंत पोचता आले असते.

या पुस्तकातील काही कठीण शब्दांच्या अर्थाविषयी संपादिकेने काही अंदाज केले आहेत. त्यातील एका शब्दार्थाच्या बाबतीत हा अंदाज धडधडीत चुकलेला दिसतो. तो म्हणजे गोडसे भटजींच्या लेखनात येणारा 'मेखजीन' हा शब्द. या शब्दाच्या अर्थनिर्णयनाविषयी संपादिका शहा म्हणतात,

'' 'मेखजीन' हा शब्द पाहण्यासारखा आहे. ...काडतुसे शिपायांना धर्मबाह्य वाटत असतात. त्यामुळे शिपाई गुप्त पत्रे रवाना करतात की, 'काडतुसांबाबत प्रत्येकाने आपल्या अधिकाऱ्यांना सांगावे... त्या त्या छावणीत गोरे असतील ते कापून काढून दारूगोळा, मेखजीन व खजिना गुदात सु ॥ आपले ताब्यात घेऊन छावणीस आग लावावी.' या वाक्यातील मेखजीन हा सामासिक शब्द आहे. त्या सामासिक शब्दाचा अर्थ लागत नाही. म्हणून मग मेख मोठी खुंटी आणि जीन म्हणजे लक्षणेने घोडा असा अर्थ निघतो (ऐतिहासिक शब्दाकोश- य.न. केळकर) म्हणून मग मेखजीन म्हणजे खुंट्याला बांधलेले घोडे असा अर्थ काढता येतो आणि तो संयुक्तिक वाटतो.'' (पृ.६१)

'मेखजीन'चा य.न. केळकरांनी लावलेला हा अर्थ संपादिकेने स्वीकारणे निखालस चुकीचे आणि अज्ञानमूलक आहे. कारण मेखजीन हा 'मॅगझीन' (magazine) या इंग्रजी शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे. त्याचा अर्थ दारूगोळा ठेवण्याचे ठिकाण, दारूखाना असा आहे. १८५७ च्या बंडाच्या आणि सशस्त्र प्रतिकाराच्या संदर्भात सहज येणारा हा शब्द आहे. त्यामुळे तो सामासिक शब्द समजून त्याच्या अर्थाची अशी ओढाताण करण्याची गरज नव्हती. त्यातून अर्थाचा अनर्थ झाला, ते वेगळेच. एखादी भाषा परभाषेतले शब्द घेते तेव्हा या आदत्त शब्दांचा उच्चार, घेणाऱ्या भाषेच्या उच्चारण-प्रक्रियेनुसार होतो. इंग्रजीतून मराठीत आलेली तिकिट, मास्तर, माचीस, ठेसन अशी असंख्य उदाहरणे आपल्या परिचयाची आहेत. 'मॅगझीन'चे 'मेखजीन' हे रूप असेच आहे. गोडसे भटजींच्या वृत्तांतील संदर्भातच खरे तर हा अर्थ दडलेला आहे. केळकरांनी लावलेला अर्थ न स्वीकारता संपादिकेने संहितेचेच बारकाईने वाचन केले असते तर तिला हा अर्थ गवसला असता.

संहितेतील जी उदाहरणे आपल्या संपादकीय प्रस्तावनेत शहा देतात, त्यांच्यापुढे त्यांचे पृष्ठक्रमांक त्या देत नाहीत. त्यामुळे ते संदर्भ मुळातून शोधणे व ताडून पाहणे

जिकिरीचे होते. शिवाय 'मेखजीन' या संदर्भातली संपादिकेने प्रस्तावनेत उद्धृत केलेली वाक्ये व पुढच्या संहितेतील वाक्ये यांत तफावत आहे. गोडसेभटजींची वाक्ये पुस्तकात अशी आहेत :

''...काळे लोक बेदील होऊन कडामिनीचे बार काढून तोफही सुरू करून दंगा करावयास लागले. ती छावणी लहान. गोरे लोक थोडे होते, ते सर्व त्या पलटणी लोकांनी ठार मारून दारूगोळा, मेखजीन, खजिना, तंबू वगैरे सर्व सामान आपल्या ताबीत घेऊन छावणीस आग लावून बेदिल होऊन सर्व काळे पलटणी निघोन... बाईसाहेबास हाका मारू लागले.'' (पृ.११२)

(प्रस्तावनेतील अवतरण आणि संहितेतील मजकूर यांच्यात एकवाक्यता नसल्याची आणखीही उदाहरणे आहेत, उदा० पृ. ४९ व पृ. २०१-०२)

या भाषिक अभ्यासात आणखीही बऱ्याच चुका जाणवल्या. त्यातील आणखी एक उदाहरण पृ. ६० वर मृणालिनी शहा ''बिकीट'' या इंग्रजी पिकेट शब्दाच्या अपभ्रंशाबद्दल म्हणतात,

''पिकेट असा उच्चार जरी य.न. केळकरांनी लिहिला असला. तरी इंग्रजीमध्ये (Picket) (पिकिट) असा उच्चार आहे. ... शिवाय इंग्रजी शब्दारंभी 'प' चा उच्चार 'ब' किंवा 'फ' असा होतो, हे ही येथे आठवले.'' (पृ.६०)

इंग्रजीत शब्दाच्या आद्यस्थानी येणाऱ्या 'प'चा उच्चार 'ब' असा कधीच होत नाही. आद्यस्थानी येणाऱ्या [p], [t], [k] या व्यंजनांचा उच्चार महाप्राणयुक्त (ॲस्पिरेटेड) होतो म्हणजे pin, tin, car या शब्दांमधील आद्यस्थानी असलेले व्यंजन महाप्राणयुक्त उच्चारले जाते. पण याचा 'पिकेट' > 'बिकट'शी काहीही संबंध नाही.

मोडी लिखिताच्या वैशिष्ट्यांविषयी वाचकांना माहिती देताना मृणालिनी शहा म्हणतात, '' ...सध्याचे लेखननियम पाळून हे लेखन छापले आहे... मोडी लेखनात अनुस्वार लहरीप्रमाणे देतात किंवा देत नाहीत. काही ठिकाणी उगाच टाक झाडून वाटेल तिथे टिंबे टाकतात... मी या आवृत्तीमध्ये अनुस्वार पदरचे दिले आहेत.'' (पृ.६५) पूर्वीच्या लेखनात अनुस्वारांचा अतिरेक होता ही गोष्ट खरी आहे. पण संपादिकेने पूर्ण माहितीच्या अभावी केलेले 'उगाच टाक झाडून' हे सर्वसाधारण विधान मोडी लेखकांवर अन्याय करणारे आहे. शिवाय, 'सध्याचे लेखननियम पाळून हे लेखन छापले आहे' असे म्हटल्यावर 'अनुस्वार पदरचे दिले आहेत' हे विधान चांगलेच खटकते.

एकंदर पुस्तकाच्या निर्मितीत मुद्रणदोषही खूप राहून गेले आहेत. 'प्रायश्चित्त' हा शब्द 'प्रायश्चित्त', 'प्रायश्चित', 'प्रायश्चित्' अशा तीन प्रकारे मुद्रित झाला आहे.

'ध्रुव', 'ध्रूव'; 'फलश्रृती', 'फलश्रुती' असे दोन्ही प्रकारे छापलेले आढळते. खेरीज, 'पारंपारिक', 'पुनमुर्दण', 'डोबिंवली', 'व्युत्पन्नता', 'उत्पत्ती', 'अलंकारिकता' ही आणखी काही उदाहरणे. काही ठिकाणी संपादिकेचे वाक्यरचनेकडे दुर्लक्ष झाले आहे, उदाहरणार्थ, ''...इत्यादी पुस्तके लिहिले आहे.'' (पृ.३३); ''...आपला नातू मृत्यूने मेल्याचा प्रसंग भोगावा लागतो की काय या शंकेने...'' (पृ.४१). काही शब्दांचे लेखन संहितेत एकप्रकारे तर शब्दार्थसूचीत वेगळ्याप्रकारे आहे. उदा० 'कंटाळी' (१४२), 'कंठाळी' (२१८); 'सलिदा' (१४२), 'सलीदा' (२२४), संपादिकेने केलेली काही विधानेही खटकतात. उदाहरणार्थ,' ''रामदास हे प्रख्यात पर्यटनपटू आहेत.'' (पृ.४६) ''या स्थळांना त्यांनी दिलेल्या भेटी या एकजीव होऊन दिलेल्या नाहीत.'' (पृ.४६)

याच परिच्छेदात पुढे संतसाहित्याबद्दल संपादिकेने केलेले विधान धाडसाचे वाटते, ते असे : ''अशा पद्धतीने प्राचीन साहित्याच्या प्रेरणा धर्मपंथीय असल्यामुळे त्यांनी केलेली प्रवासवर्णनेही धर्मपंथीयच झाली आहेत. शिवाय हे साहित्य पद्यमय आहे आणि मुख्य म्हणजे मुद्रणकलेचा अभाव, या गोष्टींमुळे ते मर्यादित श्रोत्यांपुरते आणि अत्यंत थोडक्या वाचकांपुरते मर्यादित राहिले.''

उलट, भाविक सश्रद्धतेमुळे संतसाहित्याला महाराष्ट्रातच नव्हे; तर भारतभर पूज्य स्थान होते. पारायणे, सप्ताह इत्यादींद्वारे ते फार मोठ्या समाजात पोचले व शेकडो वर्षे टिकून राहिले हे वादातीत सत्य आहे.

भाषेच्या अंगाने लेखनाचा अभ्यास करायचा हा संपादिकेचा संकल्प या पुस्तकातून सिद्धीस गेला नसला तरी अन्य बाबतीत त्यांनी मेहनत घेतलेली जाणवते. 'माझा प्रवास'च्या आत्तापर्यंतच्या सर्व प्रतींचा अभ्यास व मूल्यमापन, लेखकाचे चरित्र, त्याच्या प्रवासाचा नकाशा (हा नकाशा वैद्यप्रतीत आहेच !), वाङ्मयीन इतिहासात या पुस्तकाचे स्थान यांचा आढावा घेण्यात त्यांनी कुचराई केलेली नाही. भौगोलिक स्थळे, काही विशेष शब्दांचे अर्थ, संस्कृत ग्रंथ, शब्द, विधी इत्यादींची माहिती, संदर्भसूची इत्यादी परिशिष्टे अभ्यासकाला उपयुक्त ठरतील. ऐतिहासिक सामग्रीचा उपयोग या दृष्टीने करून घेण्यात मृणालिनी शहा यांना यश आले आहे. (मुद्रणदोष वगळता) 'राजहंस'ने पुस्तकनिर्मितीही देखणी केली आहे. आपले उद्दिष्ट या पुस्तकाने एका मर्यादेपर्यंत साध्य केले आहे. ■

(कंसातील आकडे परीक्षित पुस्तकातील पृष्ठांक आहेत.)

सुप्रिया 61/14 एरंडवणे, प्रभात रोड, 14 वी गल्ली
इन्कमटॅक्स ऑफिसजवळ, पुणे 411004. दूरभाष क्र. 020 - 25468693

# भाषाभान

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक : 'भाषाभान' - डॉ. नीलिमा गुंडी. उन्मेष प्रकाशन, पुणे ३०. २००८. पृष्ठे १७२. किंमत रु. १५०/- ]

'भाषाभान' हा डॉ. नीलिमा गुंडी यांच्या भाषाविषयक तेहेतीस लेखांचा संग्रह आहे. लेखिकेने सोयीसाठी त्यांचे दोन भाग केले आहेत; पण त्या भागांना शीर्षके दिलेली नाहीत. ललित आणि वैचारिक अशा कप्पेबंद विभागणीत मावणारे असे हे लेख नाहीत, याची लेखिकेला जाणीव आहे. लेखांचा आशय आणि स्वरूप पाहता त्यातील लेखांची थोडीफार वर्गवारी करता येते. त्यात काही लेख भाषिक निरीक्षणांवर आधारित आहेत. मुलांची भाषा, नवतरुणांची भाषा, स्त्रियांची भाषा, मराठीवर हिंदी आणि इंग्रजीच्या रेट्याचा होणारा परिणाम, मराठीतील काही वाक्प्रचार, भाषेतील लेखनदोष असा साधारणपणे एक वर्ग मानता येईल. या स्वरूपाचे सर्वाधिक म्हणजे पंधरा लेख या संकलनात आहेत. मराठी भाषेची आजची स्थिती, तिच्या अध्यापनातील काही समस्या आणि त्यांची सोडवणूक, मराठी भाषेपुढील आव्हाने आणि त्यासाठी उपाययोजना अशा प्रकारच्या सात लेखांचा दुसरा एक गट या पुस्तकात आहे. 'बालसाहित्य, बालशिक्षण आणि मुलांची भाषा', व 'काव्यसमीक्षेची परिभाषा : काही निरीक्षणे' हे दोन लेख चर्चासत्रांमध्ये सादर केलेल्या निबंधांच्या स्वरूपाचे आहेत. काही साहित्यकृतींची भाषाशैली, काहींची शीर्षके, काहींमधील प्रतिमा, साहित्यातील श्रुतयोजने, यशवंतांच्या 'आई' कवितेचे संस्करण अशा सात लेखांचा यात समावेश आहे. पुस्तकाच्या शेवटी आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भाषावैज्ञानिक डॉ. अशोक केळकर आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या मुलाखती आहेत.

ही वर्गवारी देण्याचे कारण लेखसंग्रह संपादित करत असताना असे काही धोरण ठेवल्याचे आढळत नाही. लेखांना शीर्षके आहेत; परंतु अनुक्रमणिकेतही अंक नाहीत. त्यामुळे मुलांच्या भाषेविषयी पहिले पाच लेख झाल्यानंतर मध्येच खाणे, फुटणे या वाक्प्रचारांशी संबंधित दोन लेख येतात. पुन्हा 'एक दोन साडे माडे ऽ तीन' हा लेख

येतो. 'स्त्रियांची भाषा' या विषयावर असलेले दोन लेख, 'भाषिक क्षमतांची निगराणी', 'वाचन एक भाषिक कौशल्य' हे दोन लेख आणि 'व्यक्ती आणि वल्ली : भाषाशैलीची वैशिष्ट्ये', 'अपूर्वाईमधील भाषेचे संवेदन' अशा चार लेखांच्या मध्ये येतात. वास्तविक मुलांची भाषा, स्त्रियांची भाषा, नवतरुणांची भाषा असा क्रम साधणे शक्य होते. मराठीवर होणारी आक्रमणे, अध्यापनातील अडचणी, भाषिक कौशल्यांविषयी उपाययोजना आणि मार्गदर्शन असा एक सुसंगत गट कप्पे न पाडता केवळ अनुक्रम साधून देता आला असता आणि त्यामुळे स्फुट लेखन जसजसे छापले गेले तसतसे यदृच्छया संकलित केले असे जे स्वरूप या लेखसंग्रहाला आले आहे तसे ते आले नसते. यातील प्रत्येक लेख स्वतंत्र असता तर गोष्ट वेगळी; अन्यथा त्यावर संपादकीय हात फिरवणे आवश्यक होते. असे न केल्यामुळे 'हवी ''शब्द जिरवा'' मोहीम' या लेखातील 'व्यस्त', 'ताजगी', 'प्रतियोगिता' ही हिंदीच्या आक्रमणाची उदाहरणे त्या पाठोपाठच्या 'मराठी : एका ऐतिहासिक वळणावर' याही लेखात आली आहेत. (मातृभाषा) सुसंस्कृत माणसाची ती जणू चौथी मूलभूत गरज असते' हे वाक्य सात आणि एकशे अडतीस पृष्ठांवर येते.

या सर्व लेखांमधून आढळणारी समान गोष्ट म्हणजे लेखिकेची मराठी भाषेवर असलेली प्रांजळ निष्ठा. गोमटेश्वराच्या पायाशी दगडात कोरलेली :

श्री चावुण्डराजें करवियले
गंगराजें सुत्ताले करवियले

ही वाक्ये ( ती लेखात म्हटल्यानुसार एक नसून दोन आहेत) पाहून तिचे मन आनंदाने भरून येते. ती वाचताना भाषेच्या गंगोत्रीशी पोचल्याचा अलौकिक अनुभव तिला येतो. भाषेतील उच्चारांना ती 'मंत्रशक्ती' असा शब्द वापरते. भाषाशुद्धीची मोहीम तिने उघडली नसली तरी व्यवहारातील वेगळी रूपे टिपण्याची संवेदनशीलता तिच्याजवळ आहे. आपल्या मुलीच्या भाषिक विकासाचा आलेख नोंदवून ठेवण्याइतकी ती जागरूक आहे. लेखिकेची अभ्यासू वृत्ती अनेक ठिकाणी पहायला मिळते. 'मराठीत सरस रीतीने फकीकेत लिहिणारे हेच पहिले' या स.का.छत्र्यांविषयी दादोबा पांडुरंगांनी लिहिलेल्या वाक्यातील 'फकीकेत' शब्दाचा 'गद्य लेखनशैलीत' हा अर्थ तिने कोशातून मिळवला. नेलकटरसाठी मराठीत 'नऱ्हाणी' हा शब्द आहे हा शोधही तिला एका कोशातच लागला. कवी यशवंतांनी आपल्या 'आई' या कवितेत केलेली संस्करणे कशी समर्थनीय आहेत. हे तिने दाखविले आहे. द.भा. धामणस्करांच्या 'दोन दरांच्या टोमॅटोज्पासून' या कवितेचा सामाजिक अन्वयार्थ लेखिकेने चांगला उलगडून दाखवला आहे. प्रदीर्घ काळ मराठीचे अध्यापन केल्यामुळे स्वाभाविकपणे आलेल्या बहुश्रुततेचा

(‘वेलरेड’ असण्याचा) प्रत्यय या पुस्तकात अनेक कवितांमधून, अवतरणांमधून येत राहतो. त्या दृष्टीने ‘श्रुतयोजन : भाषेचा वारसा’ आणि ‘लक्षवेधी शीर्षके’ हे दोन लेख वाचनीय आहेत. ‘भाषिक क्षमतांची निगराणी’, ‘वाचन : एक भाषिक कौशल्य’ ‘बालसाहित्य, बालशिक्षण आणि मुलांची भाषा’ या लेखांमधून लेखिकेला वाटणारी कळकळ प्रतीत होते. ज्या दोन विद्वान भाषातज्ज्ञांच्या मुलाखती या संग्रहात समाविष्ट आहेत, त्यांना विचारलेल्या प्रश्नांमध्ये नेमकेपणा आहे. एकातून डॉ. केळकर यांनी विदग्ध आणि वैज्ञानिक साहित्याच्या केलेल्या वाटचालीचा आलेख मिळतो, तर दुसरीतून डॉ. कोत्तापल्ले यांच्या निर्भीड विचारांचा प्रत्यय येतो.

असे असूनही भाषेविषयी काही मूलभूत, अपूर्व असे वाचल्याचे समाधान या पुस्तकातून मिळत नाही. याचे कारण बरेच लेख अतिशय त्रोटक आहेत. त्यांचा विस्तार, मांडणी तर्कशुद्ध रीतीने होत नाही. जाता जाता आठवले ते लिहिले असे काहींचे लेखन झाले आहे. उदा० ‘काळ आणि भाषा : एक चकवा’ हा लेख. ग्रीनिच वेळेपासून आरंभ होणारा हा लेख अवतरणांसह दोन पानांत संपून जातो. आपल्या घरच्या, आजूबाजूच्या व्यक्तींच्या उद्गारांतून, अनुभवांतून लेखिका काही संदर्भ देते. डॉ. इरावती कर्वे यांचे ललित लेख असे असत. पण लहान गौरीच्या (देशपांडे) उद्गारांनी सुरू झालेला त्यांचा ‘दिक्काल’ हा लेख किती मोठा पल्ला गाठतो ! केवळ कल्पित वाटणारी म्हणून रसभंग करणारी उदाहरणे काही लेखांत सापडतात. ‘अस्मानी’ आणि ‘सुलतानी’ ही जुळ्या मुलींची नावे (१३) कोण ठेवेल ? बारशाला आलेला छोटा मुलगा ‘ओजस्वी’ हे नाव ऐकताच ‘नाव नाही विशेषण !’ म्हणतो (१६) हे जरा अस्वाभाविकच वाटते. वा.म. जोशींच्या कादंबरीवरून काही (किती ?) महत्त्वाच्या मराठी साहित्यिकांनी आपल्या पत्नीचे नाव ‘रागिणी’ ठेवले. (१२) (विद्याधर पुंडलीक सोडल्यास अन्य कोणत्या ?) ‘साहित्य हे भाषेच्या संदर्भातील ‘कळसूबाईचे’ शिखरच ठरते (१७) (कोणत्या अर्थाने ?) ‘आंधळी कोशिंबीर’, ‘काकडी कोशिंबीर’सारखे खेळ (२२) यांतला दुसरा खेळ कोणता ? ‘भोज्या’ हा शब्द भोग्यावरून आला आहे (२२) हे कसे ? लेखिका म्हणते, भोग्या म्हणजे ज्याने पुष्कळ अनुभवले आहे असा. भोज्या अनेकांचे स्पर्श अनुभवतोच !’ ही व्युत्पत्ती विश्वास बसू नये एवढी बादरायण आहे. भोग्य/भोग्या म्हणजे उपभोग घेण्याजोगा. लीळाचरित्रात याला ‘भो करणे’ (उत्त०८५) असा शब्द वापरलेला आहे. प्रत्येक मराठी शब्दाचे मूळ संस्कृतातच शोधण्याची खटपट कशासाठी ? सागरगोट्यांच्या खेळातील ‘वरखई’ या शब्दाचा खुलासा असाच अगम्य आहे. मुळात तो शब्द ‘वख्खई’ असा आहे. सात सागर-गोट्यांतला एक उंच फेकून तो झेलण्यापूर्वी प्रथम एकेक, नंतर दोन दोन असे करत

शेवटी सर्व सहा सागरगोटे एका फेकेत गोळा करून वरचा झेलणे असा तो डाव असतो. हा डाव या क्रमाने पूर्ण केला की दुसऱ्या भिडूवर वख्खई झाली असे म्हणतात - चूक झाल्यास वख्खई मोडली. सागरगोटे खेळताना वरून खाली टाकायचे (आणि मग पुढे काय करायचे ?) असा खेळ पाहिल्याचे आठवत नाही.

एकदोन लेखांमध्ये औचित्यभंगाचा दोषही लक्षात येतो. लक्ष्मीबाई टिळकांच्या आत्मचरित्राचे 'गाजलेले' (५०) हे वर्णन अनुचित आहे. मराठीत 'सांगत्ये ऐका' हे आत्मचरित्र 'गाजले'. खुशवंतसिंग किंवा प्रतिमा बेदी यांची आत्मवृत्ते 'गाजतात'. अशा ठिकाणी शब्दांची निवड जपून करायला हवी. शब्दांप्रमाणे कल्पनेच्या बाबतीतसुद्धा हा अनुभव येतो. 'फुटणे'शी संबंधित वाक्प्रचारांचे संकलन करता करता नशीब फुटणे, बांगडी फुटणे हे अशुभसूचन आणि तांबडं फुटणे, अंकुर फुटणे हे निर्मितिदर्शक इतक्या दोन टोकाचे वाक्प्रचार आढळतात, हे लेखिकेचे निरीक्षण आहे. (३१). हा अनुभव लेखिकेला 'शुभा-शुभाचा फिटे किनारा' असा वाटतो. वास्तविक मर्ढेकरांनी

ह्या गंगेमधि गगन वितळले
शुभाशुभाचा फिटे किनारा

अशी केवढी भव्य आध्यात्मिकतेच्या उंचीला पोचणारी प्रतिमा कवितेच्या प्रारंभीच उभी केली होती. ती सामान्य वाक्प्रचारांसाठी वापरणे उचित वाटत नाही. नवतरुणांच्या भाषेचे पोरकट वाटणारे नमुने देऊन झाल्यावर (४१,४२) लेखिकेला एकदम 'ज्ञानेश्वरी'च्या बाराव्या अध्यायात ज्ञानेश्वरांनी भाषेवर केलेले रूपक आठवते. लेखिकेची ही तुलना रसभंग करणारी वाटते.

काही ठिकाणी लेखिकेने केलेली शब्दयोजना थोडी खटकते. स्त्रियांनी सक्षमीकरण वर्षात 'सशक्त' व्हावे हा हिंदी प्रभाव पाहून लेखिका म्हणते, ''समस्त स्त्रिया शरीराने कृश... त्यांना पौष्टिकाच्या उपायांची'' (४५) जरुरी आहे. येथे विशेषणाचे नाम बनविल्याने ही रचना सदोष झाली. 'माझी स्वप्नं चूर झाली' (४८) या वाक्यानंतर लेखिकेने स्वप्नांच्या चुरा होतो किंवा ती चक्काचूर होतात असे म्हटले आहे. हा हिंदी चकनाचूर किंवा चूरचूर या शब्दांचा प्रभाव आहे, ह्याची नोंद केली नाही. मुली लाजेने चूर व्हायच्या तिथे आता स्वप्ने चूर व्हायला लागली असे म्हणता आले असते. एके ठिकाणी 'त्याची व्यावहारिक जगण्याची पातळी' (५७) ही शब्दयोजना वास्तविक 'त्याच्या जगण्याची व्यावहारिक पातळी' अशी असायला हवी. 'दिण्णले गहिल्ले उल्लविरे तत्थ मरहट्टे' या 'कुवलयमाला'मधील अवतरणात लेखिकेने 'दिले घेतले असे' (रोखठोकपणे) म्हणणारे, ही भर निष्कारण घातली आहे (५८). मुळात अनेक

प्रांतांमधल्या लोकांचे वर्णन, वृत्तिविशेष आणि त्यांच्या भाषेचा नमुना अशी दोन दोन ओळींची ही रचना आहे. मरहट्टयांचे नेमके विशेष पहिल्या ओळीत आल्यानंतर (दढमडह सामलंघे सहिरे अहिमाण कलहसीले) पुन्हा स्वतःचा शब्द मध्ये घालण्याचे इथे कारण नव्हते. अवतरणांचा अर्थ नेमका असावा.

पुस्तकाच्या दुसऱ्या भागात 'वैचारिक' लेख आहेत. त्यांचे स्वरूप बरेचसे नैमित्तिक आहे. श्रुतयोजन, लक्षवेधी शीर्षके (कवितेच्या ओळींची), भाषाव्यवस्थेशी निगडित प्रतिमा हे लेख केवळ संकलनात्मक आहेत. प्रतिमांच्या लेखात लिपी, विरामचिन्हे, व्याकरण यांच्यावरून वापरलेल्या अनेक प्रतिमांची उदाहरणे दिली आहेत. पण र.कृ. जोशी यांच्या काव्यनिर्मितीचा उल्लेख त्यात नाही. 'भाषिक क्षमतांची निगराणी', 'वाचन : एक भाषिक कौशल्य', 'म मराठीचा' हे लेख केवळ भाषेविषयी आहेत म्हणून त्यांचा समावेश ललित लेखसंग्रहात केल्यामुळे संग्रहाच्या एकजिनसी स्वरूपाला धक्का पोचतो.

असे असूनही भाषेविषयीच्या निरीक्षणांसाठी 'भाषाभान' हा लेखसंग्रह वाचनीय आहे. मराठीचे किती अध्यापक केवळ भाषेविषयी अशा पोटतिडिकीने लिहितात ? डॉ. नीलिमा गुंडी यांची मराठीविषयीची आस्था आणि अनुभव यांचे दर्शन या पुस्तकाद्वारे निश्चित होते. ■

F-44, सुंदरनगरी, 308, सोमवार पेठ, पुणे 411011. दूरभाष : 26111113

## दोघींचे भांडण, तिसरीचा लाभ

वास्तविक पाहता भारतीय समाजातील भाषाभेद हें भारताच्या सांस्कृतिक विविधतेचे मूलाधार आहेत. या भाषाभेदांची समाजातील जातिभेदांशी तुलना करून त्यांना विकृती मानणे गैर आहे. अज्ञानमूलक आहे. ज्या भारतीय संस्कृतीचा आपण अभिमान बाळगतो ती भारतीय संस्कृती प्रादेशिक भाषाभेदांनी वैशिष्ट्यपूर्ण केलेल्या प्रादेशिक संस्कृतींनीच बनलेली आहे. प्रादेशिक भाषा व संस्कृती वजा करून 'भारतीय संस्कृती' असे काहीच उरत नाही. म्हणूनच इंग्रजी भाषेचे वाजवी महत्त्व मान्य करत प्रादेशिक भाषांचे जतन व संवर्धन करण्याची आज गरज आहे. ही जबाबदारी भारतीय नागरिक म्हणून सर्वांचीच आहे. स्थानिकांची तसेच स्थलांतरितांचीही. अर्थार्जनासाठी आपापला प्रांत आणि भाषा सोडून देशांतर्गत स्थलांतर करणाऱ्यांनी स्थानिक भाषा आणि संस्कृतीचा आदर करायला शिकले पाहिजे. पण तसे होताना दिसत नाही. आम्ही आमची भाषा सोडली, तुम्ही तुमची सोडा, या वृत्तीमुळे इंग्रजीसारख्या तिसऱ्या भाषेचे फावते.

डॉ. प्रकाश परब, 'भाषा, समाज आणि शासन',
'महाराष्ट्र टाइम्स' (मुंबई) ११-०९-२००८

पुस्तक-परीक्षण

# अक्षरस्पंदन

सुमन बेलवलकर

[ परीक्षित पुस्तक : 'अक्षरस्पंदन' - डॉ. नीलिमा गुंडी. उन्मेष प्रकाशन, पुणे ३०. २००८. पृष्ठे १६८. किंमत रु. १२०/- ]

साहित्याच्या रसिक वाचकांची अभिरुची प्रत्येक पिढीनुसार बदलत असते. अभिरुचीच्या या घडणीत समकालीन साहित्याचा फार मोठा वाटा असतो. साहित्यातील संक्रमणाची नोंद प्रत्येक पिढी आपापल्या परीने घेत असते. डॉ. नीलिमा गुंडी यांचे 'अक्षरस्पंदन' हे पुस्तक प्रामुख्याने अशा समकालीन कवी आणि लेखकांच्या साहित्या-विषयी आपले अनुभवकथन करते. 'रसिकांमधल्या सुप्त प्रतिभाशक्तीला समर्पित' असे हे पुस्तक अनेक प्रतिभावंतांच्या साहित्यनिर्मितीचा मागोवा घेते.

वेगवेगळ्या निमित्ताने निरनिराळ्या नियतकालिकांमधून प्रसिद्ध झालेल्या लेखांचे हे संकलन आहे. त्यामध्ये 'कवितेशी गट्टी जडण्याचे (जमण्याचे) दिवस' हा पहिला लेख आहे. आधीच्या पिढीकडून गेय, छंदोबद्ध कवितांमधून काव्य कसे भेटले हे लेखिकेने त्यात सांगितले आहे. 'कवितेचे भावतरंग'मध्ये 'बालभारती'मधील 'झुळुक मी व्हावे' या काहीसे अज्ञात असलेल्या कवी दा.आ. कारे यांच्या कवितेचे रसग्रहण आहे. आज पन्नाशीत असलेल्यांना पाठ्यपुस्तकांमधून मिळालेले 'कवितेचे पाथेय' हा एका लेखाचा विषय आहे. याशिवाय कुसुमाग्रजांची बालकविता, विंदा करंदीकरांची बालकविता, 'विशेषणात न मावणारा कवी' (विंदा करंदीकर), 'विशाखा'ने आम्हांला काय दिले ?', 'अष्टपैलू वसंत बापट' असे निवडक कवींवर सहा लेख या संग्रहात आहेत. रेल्वे, पक्षी, झाडे, वसंत ऋतू, पाणवठे, पंढरपूरची रुक्मिणी, आई, बाप आणि मुलगी, बाप आणि दलित काव्य, ईश्वर अशा शीर्षकांखाली असलेल्या कवितांचे तुकडे गोळा करून लेखिकेने जवळपास अकरा लेख लिहिले आहेत. एका लेखात तर कुसुमाग्रजांच्या 'स्वप्नाची समाप्ती' या प्रसिद्ध कवितेची मजरुह सुलतानपुरींच्या एका चित्रपटगीताशी तुलना केली आहे.

'चाळ' (मुंबईतली) या घटकाची साहित्यातील प्रतिबिंबे यावर एक लेख आहे. अर्थात 'कथाकादंबऱ्यांमधील बदलती स्त्री-प्रतिमा' हा प्रबंधाला शोभेल असा भारदस्त

विषयही लेखिकेने निवडला आहे. प्रकाश संत यांचा 'लंपन', मिलिंद बोकील यांची 'शाळा,' इरावतीबाईंचे 'ललितलेखन' आणि 'भाषेचे भाष्यकार' हा डॉ. अशोक केळकर यांच्यावरील व्यक्ती आणि वाङ्मयविषयक लेख असे गद्यासंबंधी लेख या संग्रहात आहेत.

लेखिका स्वत: साहित्याची साक्षेपी वाचक आणि मराठी साहित्य या विषयाची प्रदीर्घ काळ अध्यापक आहे. भाषा-विषय शिकवताना कसे शिकवावे याचे नेमके उत्तर लेखिकेजवळ आहे. 'शब्दांचे दुसऱ्या शब्दांशी लागणारे नाते, शब्दाचे अर्थाशी लागणारे नाते, त्या अर्थाचे आपल्या जगण्याशी लागणारे नाते आणि त्याचवेळी संस्कृतीच्या आजवरच्या खळाळत्या प्रवाहाशी लागणारे नाते – या साऱ्यांची एकसंधरीत्या प्रचिती येईल असे शिकवावे.' (१७) हा तो गुरुमंत्र आहे. प्रत्यक्षात हे शिक्षण कसे चालते हे शिक्षकांना पुरुषराज अळूरपांडे म्हणजे कोण हे न उमगणे, गवऱ्यांचे उत्तरासह दिलेले कोडे वाचूनही त्याचे उत्तर न समजणे, 'मी कोण होणार' या हुकमी निबंधाचे 'चिमणी' हे उत्तर देऊन साऱ्या वर्गाला निबंध फळ्यावर लिहून दिलेला असणे – असे चालते हे लेखिकाच आपल्याला सांगते.

लेखिकेचे कवी, कवयित्री, गद्यलेखक यांच्याविषयीचे लेख त्यांची ठळक वैशिष्ट्ये स्पष्ट करतात. 'लंपनच्या आंतरिक विश्वात... संवेदनाविश्व... भावविश्व आणि विचारविश्व यांना जागा आहे'(२१). हे तिचे निरीक्षण आहे. गाडगीळांच्या खुटमुट्यांच्या चाळीत 'जातीय दंगलीच्या घटनेचा प्रकाश जेव्हा या चाळकरी कारकुनांच्या जगण्यावर पडतो, तेव्हा त्यांच्या रक्तातील अंधाऱ्या पेशीसुद्धा दिसू लागतात' असे लेखिकेला वाटते (१४५). 'एकंदर मराठी कविता काळाच्या स्पंदनांशी इमान राखत परंपरेचे सत्त्व पारखून घेत आहे.' हा तिचा निष्कर्ष आहे (१६२). स्त्रीवादी साहित्यात स्वातंत्र्य हे मूल्य महत्त्वाचे बनले; पण 'कशापासून स्वातंत्र्य आणि कशासाठी स्वातंत्र्य याविषयीची भक्कम वैचारिक बैठक सर्वच लेखकांकडे आढळत नाही' असे तिचे निरीक्षण आहे. विंदा करंदीकर हे 'विशेषणात न मावणारे कवी' आहेत तर कुसुमाग्रजांच्या 'विशाखा'ने उत्कटतेच्या अंगभूत भरारीचा अनुभव दिला अशी लेखिकेची साक्ष आहे. एकंदरीत हे लेख वाचताना लेखिकेचे मन भावनाशील, उत्कट रसिकाचे आहे हे जाणवते.

परंतु समीक्षापर लेखनाला एवढे पुरेसे नसते. अशा लिखाणातून काही मौलिक असे मुद्दे मांडता येणे आवश्यक असते. त्याचप्रमाणे संदर्भांची, वाक्यरचनेची, शब्दयोजनेची अचूकताही अपेक्षित असते. उदाहरणार्थ, पहिल्याच लेखातील 'रे त्या पक्ष्यावर दगड मी' आणि इतर सर्व कवितांच्या कवींची नावे लेखात नाहीत. 'ती

जाईची कोमल लतिका' (पृ.११)च्या २,३,४ या ओळी मात्रांप्रमाणे अचूक लिहिलेल्या नाहीत. 'शाळा' ही कादंबरी संवेदनशीलता आणि मनोविश्लेषण या दृष्टीने समीक्षकांनी गौरविलेली कृती आहे. तिच्या समीक्षणात 'मुले घराबाहेर राहतात... त्यांची पावले घराकडे वळावीत अशी घरे घडवणे हे आपल्यापुढचे आव्हान आहे' (२७) अशी भूमिका घेणे, 'हा ऱ्हासशील काळ आहे.' (२८), 'मुलांना सर्व शिक्षकांविषयी आदरयुक्त प्रेम वाटत नाही' अशी तक्रार करणे (२८) काहीसे बाळबोधपणाचे वाटते. इरावती कर्वे यांच्या 'परिपूर्ती' या लेखात 'स्त्रीसुलभ नात्याचे त्यांना वाटणारे अप्रूप' (७४) नाही तर इतक्या संपन्न, प्रगल्भ, स्वयंप्रज्ञ आणि विकसित व्यक्तिमत्त्वाची ओळख प्रत्येक टप्प्यावर पुरुषांशी असलेल्या नात्याच्या संदर्भातच होते हे इरावतीबाईंनी मांडले आहे. सर्वच समीक्षकांनी एक सुबोध अर्थ घेतल्यावर अखेर आनंद कर्वे यांनी तो खुलासा केला होता.

काही ठिकाणी वाक्यरचना, शब्दयोजना किंवा शब्दांचा क्रम यांमधील सदोषता रसहानी करताना दिसते. लेखिकेची आई खणखणीत स्वरात 'रानात, सांग कानात आपुले नाते' म्हणते; आणि अभावित विनोद घडतो (१०). सर्वांना रसस्नात होता यावे म्हणून वापरलेले 'शिक्षणाच्या दहीहंडी'चे रूपक (१५) शिक्षकांच्या संख्येच्या प्रमाणात व्यस्त ठरते. 'फुलपाखरू'मधल्या 'मी धरु जाता येई न हाता ' या ओळीत तरलतेला जोडून व्यवहारविमुखता आहे (४८) हे जरा अतीच वाटते. 'मेंदी'तील इंदिरा संत यांची 'पिळदार अभिव्यक्ती' (५०) विलक्षण होती म्हणजे काय याचा बोध होत नाही. शान्ता शेळके यांना अत्रे यांच्या सहवासात सहजसोप्या लेखनाचे कानमंत्र (किती ?) मिळाले (६४). (कानमंत्र साधारणपणे एक असतो !) शान्ताबाई आणि बापट यांनी 'काव्यसंग्रह लिहिले !' (६५,६९) ते कसे ? काही प्रचंड वृक्षांमध्ये (वड, पिंपळ) चाफा (पांढरा, तांबडा) आणि गुलमोहर यांचा समावेश (१०८) कसा होतो ? 'प्रेम आणि मरण'मधले झाड एकतर्फी प्रेमाचे की 'मूल्यनिष्ठ जगण्याचे' प्रतीक होते ? (१०८). चारित्र्याशी निगडित अशी कोणती मूल्ये ते मानत होते ? गौहाटी या शब्दाचा 'सुपारीचा बाजार' हा नवा अर्थ इरावतीबाईंनी शोधलेला नसून (७४) तो असमिया भाषेत मुळातच आहे. लेखांमधील विवेचनात असे कच्चे दुवे दिसत असल्यामुळे लेखनावर सफाईचा हात फिरला नसल्याचे जाणवते.

काही ठिकाणी वाक्यांच्या रचनेत ढिलेपणा आढळतो. विशेषतः क्रियाविशेषणाची जागा भरकटल्यामुळे वाक्यरचनेचा तोल जातो. उदाहरणार्थ- ''जेव्हा आपण हेतुपूर्वक अध्यापनाचा व्यवसाय स्वीकारतो'' (१५), ''ग्रंथालयाचा उपयोग अनेक प्रकारे शिक्षणाशी जोडून घ्यायला हवा'' (१५), ''या पालक घडवण्याच्या





अनुक्रमणिका

प्रक्रियेला...'' (२९), ''करंदीकरांच्या अभंगांमध्ये इहवादी वृत्तीचा पीळ जोरकसपणे आहे'' (१५६) अशी त्याची काही उदाहरणे दाखवून देता येतील. काही वाक्ये केवळ वाचली तरी त्यांची सदोष रचना ध्यानात येते. उदाहरणार्थ- ''वर्गाला सुरुवातीला एक प्रश्न विचारते.'' (१६), ''मुलांचे निसर्गाशी निसर्गतःच एक नाते...'' (३१), ''निसर्गाचे निरागस सौंदर्य'' (४८), ''करंदीकरांनी परंपरेची बलस्थाने नेहमी हेरून'' (५५), ''इ.स. १९४२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या कुसुमाग्रजांच्या 'विशाखा'मध्ये... इ.स. १९३२ ते १९४९ दरम्यानच्या कविता समाविष्ट झाल्या आहेत.'' (६०), ''सामाजिक जाणिवेचे नाते... लागलेले आहे.'' (६१), ''रचनेवरील कसब (प्रभुत्व ?)'' (६५), ''सानेगुरुजींच्या हरिजनांसाठी मंदिरप्रवेशाच्या प्रवेशदौऱ्यात'' (६९), ''बापटांचे काव्यलेखन आणि काव्यदर्शन'' (६९), ''शिक्षकांचे प्रशिक्षण केले जावे'' (७८), ''त्यांच्या नावावर दोनच छोटेखानी मराठी साहित्याविषयक पुस्तके'' (८१), ''विज्ञानाकडून झालेला अपेक्षाभंग झाला.'' (८७) ''कल्पवृक्ष कन्येसाठीसारख्या काही (म्हणजे किती ? ती त्या प्रकारची एकच रचना आहे !) कविता'' (१३२), ''द्वेष उफाळून येतो तर नवल नव्हते.'' (१३८) 'झुक झुक झुक झुक आगीन गाडी' ही मामाच्या गावाला नेणारी कविता असताना वि.म. कुलकर्णी यांच्या 'गाडी आली गाडी आली'त तिचा उल्लेख (१००) असावा असे लेखनावरून वाटते. प्रत्यक्षात तो ''कोठेही जा, नेऊ तेथे दूरदूरदूर'' असा आहे. इत्यादी लेख पुस्तकात समाविष्ट करण्यापूर्वी त्यांवर संपादकीय संस्करण केले असते तर असे दोष राहिले नसते, असे पुन्हा म्हणावेसे वाटते.

लेखिकेच्या शैलीचा एक विशेष या ठिकाणी सांगावासा वाटतो. लेखिका साधा वर्तमानकाळ किंवा भूतकाळ न वापरता अनाठायी कृदन्तयुक्त रचना वापरते. म्हणजे संस्कार करून जाते (४३), मोठा प्रभाव पाडून गेली (४९), जगण्याचे तत्त्वज्ञान सुचवून जातात (५६), कविता आठवून जातात (५६), अर्थपूर्ण अनुभव देऊन जातात (५७), कल्पनाचित्र रेखाटून गेली (६२), निर्देश होत गेला (६२), लेखन... दाद मिळवून गेले (६७), वसंत... आकर्षित करून गेला आहे. (११३), ईश्वरकल्पना ठसा उमटवून गेली आहे (१५०), बलात्कारातून... बालक... प्रश्नचिन्हे समोर ठेवत जाते (१६४). अशा प्रकारची वाक्यरचना जाताजाता एखादी दुय्यम गोष्ट घडते, त्या वेळी वापरली जाते. साहित्यात काय किंवा समीक्षेत काय असे 'जाताजाता' घडून जाण्यासारखे काही नसते.

एकूण प्राध्यापकी ढंगाचा असलेला हा लेखसंग्रह आपल्या पिढीने साहित्याचे कोणते संचित मिळविले ते सांगतो; मागील पिढीकडून मिळालेल्या ठेव्यात आपल्या

वाचनातून महत्त्वाच्या लेखक-कवींचे साहित्य अभ्यासून आपल्याला काय मिळाले यावर प्रकाश टाकतो; आणि हे सर्व आजच्या तरुण पिढीच्या हाती ठेवू पाहातो. त्यात काही सामान्य विषयांसंबंधी असलेल्या कवितांचे/गद्याचे लेख वगळून आणखी काही महत्त्वाच्या लेखकांविषयी लेखिकेने लिहिले असते, तर या पुस्तकाची गुणवत्ता निश्चितच वाढली असती. ■

F-44, सुंदरनगरी, 308, सोमवार पेठ, पुणे 416011. दूरभाष : 26111113

## मराठीचा ओढा

हैदराबादेतील मराठी समाजाचे मराठी विषयाचे प्रेम जागृत होते व ते अस्सल होते. १९५५ ते १९५८ हा काळ अंशतः संभ्रमात गेला. त्याच वेळी दक्षिण भारतात प्रचलित असलेल्या सरकारमान्य व विद्यापीठमान्य ओरिएंटल लँग्वेजिज या परीक्षांचे अभ्यासक्रम समोर आले. प्राज्ञ, विशारद ऐवजी ओरिएंटल लँग्वेज पदविका व पदवी हे नामाभिधान झाले. हे कार्य करण्यासाठी मराठी संस्था असणे गरजेचे होते. त्यातून समाजाची ऊर्मी ओळखून संस्था स्थापन झाली - मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश व लगेच वर्गांना आरंभ झाला. विद्यापीठीय मान्यतेचे सोपस्कार चटकन उरकले व पाहता पाहता आजच्या मराठी महाविद्यालयाने जन्म घेतला. त्याचे मूळ सामाजिक गरजेपोटी व मराठीच्या ऊर्मीपोटी होते. शासनमान्यता व विद्यापीठमान्यता होती. परंतु ह्या वर्गांना शिकवायचे कुणी ? संस्था तर नवीन होती. जवळ काहीच नाही, एका निष्ठेशिवाय. सगळ्या मराठीच्या प्राध्यापकांनी आपापले काम वाटून घेतले. कधी काळी श्री. दि. कृ. केळकर संस्कृत घेऊन एम.ए. झाले होते. ते धोतराचा काचा मारून वकिलीची पुस्तके बाजूला ठेवून 'उत्तररामचरित' शिकवायला मैदानात उतरले. 'ओढा साऱ्यांना मराठीच्या पाशात' हा मंत्र मुळात हैदराबादचा आहे. दत्तो वामन पोतदारांनी मराठवाडा साहित्य परिषदेच्या १९४३च्या नांदेड संमेलनात तो उच्चारला होता व तो महामंत्र ठरला.

त्या वेळीही स्वाध्याय मंडळ चालू होतेच. एखाद्या पुस्तकावर, कवितेवर चर्चा, वादविवाद होत असत. याच काळात कै. बा.सी. मर्ढेकर, गंगाधर गाडगीळ इ० नवकविता, नवकथा लिहिणारी मंडळी येऊन गेली. तेव्हा त्यांच्याबरोबरची चर्चाही अतिशय रंगली. त्या वेळी केवळ मराठीचेच नव्हे तर इतर भाषाविषयांचे प्राध्यापकही या स्वाध्याय मंडळात येत असत. मला आठवतं, विंदांची 'दाताकडून दाताकडे' ही कविता ए.वि. जोशी यांनी इतकी छान समजावून दिली होती की ती विसरणे अशक्यच. हाच प्रकार 'त्रिधा राधे'चा.

तर ही वीणा म्हणा वा माळ म्हणा कहाळेकरांनी द.पं. जोशींच्या गळ्यात अडकवली. एवढे खरे की हा गजर अद्याप चालूच आहे. मराठी मंत्र वातावरणात घुमतो आहे. ■

डॉ. उषा जोशी, "म-मराठीचा" (मराठी महाविद्यालय सुवर्णमहोत्सव स्मरणिका) 2008, पृ. 5

# स्त्रीकवितेच्या अभ्यासकांस उपयुक्त ठरणारे पुस्तक

विद्यागौरी टिळक

[परीक्षित पुस्तक : 'लाटांचे मनोगत' - डॉ. नीलिमा गुंडी. पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे १५९. मूल्य रु. १३०/-]

डॉ. नीलिमा गुंडी या मराठी काव्यसमीक्षेच्या क्षेत्रात आपली स्वतंत्र ओळख निर्माण केलेल्या विमर्शक आहेत. त्या स्वत: कवयित्री आहेत. तसेच मराठी कवितेच्या काही चांगल्या संपादनांमध्येही त्यांचा सहभाग आहे. 'लाटांचे मनोगत' हे त्यांचे काव्यसमीक्षेचे पहिलेच प्रकाशित पुस्तक होय.

इ.स. १९५० ते २००० या कालखंडातील मराठीतील स्त्रियांच्या कवितेचा चिकित्सक अभ्यास यातून त्यांनी वाचकांसमोर मांडलेला आहे. 'लाट' ही त्यांना स्त्रीत्वाची प्रतिमा वाटते, असे स्पष्टीकरण प्रास्ताविकात आलेले आहे. परंतु वाचकांना हा अर्थ सहजासहजी जाणवेलच असे नाही. शीर्षकावरून हे ललित गद्य असावे, असा समज होण्याची शक्यता नाकारता येत नाही. आशयावर अधिक प्रकाश पडेल, असे शीर्षक जास्त समर्पक झाले असते.

विविध निमित्ताने झालेला या विषयाचा अभ्यास त्यांनी या पुस्तकात एकत्रित केलेला आहे. इ.स. १९५० ते १९७५ व इ.स. १९७५ ते २००० असे दोन टप्पे पाडून त्यामधील स्त्रियांच्या कवितांमधील अनुभव आणि अभिव्यक्ती त्यांनी दोन प्रकरणांमध्ये लक्षात घेतली आहे. तसेच एकूणच स्त्रियांच्या कवितेचे म्हणून लक्षात येणारे काही ठळक पैलूही त्यांनी स्वतंत्र प्रकरणात मांडले आहेत. 'स्त्रीवादी आणि स्त्रीकेंद्री कविता' या विषयावरही स्वतंत्रपणे विवेचन आहे. या सर्व अभ्यासातून जाणवलेल्या तथ्यांच्या आधारे समारोप केला आहे. याशिवाय परिशिष्टांमध्ये पाच परिक्षणे, निवडक आधारग्रंथ व कवयित्रींची निर्देश सूची दिलेली आहे.

स्त्रियांच्या कवितांमधील अनुभव आणि त्याच्या अभिव्यक्तीसंबंधी विवेचन करणारा या पुस्तकामधील भाग हा उद्दिष्टाच्या दृष्टीने त्याचा गाभा म्हणता येईल. इ.स. १९५० ते २०००मधील कवितेची ही चर्चा करणाऱ्या प्रकरणांमध्ये स्त्रियांचे विशिष्ट संवेदन, त्यातील उत्कटता, भोवतालच्या जगाविषयीचे त्यांचे आकलन, त्यातले प्रामुख्याने

काव्यविषय होणारे घर, नातेसंबंध यांसारखे घटक, बदलत्या काळात बदलत गेलेले स्वत:विषयीचे भान, कळत नकळत जीवानानुभवावरच पडलेली मर्यादा आणि त्यामुळे अभिव्यक्तीवरही येणारी दडपणे अशा विविध मुद्यांच्या आधारे घेण्यात आलेला परामर्श त्या काव्याचे स्वरूप नेमके उलगडून दाखवणारा आहे.

१९७५पर्यंतच्या कवितांचा विचार करताना या दडपणांचा उल्लेख त्यांनी केला आहे. या कवयित्री परंपरेने उभी केलेली 'मूक सोशिक' स्त्रीची आदर्श प्रतिमा रंगविण्यातच रमल्या होत्या, असे त्या म्हणतात (पृ. ४३). इंदिराबाईंच्या 'कधी कधी न अक्षरात/मन माझे ओवणार' या ओळी उद्‌धृत करून, हे व्रत घेऊनही तेथे सूचक, तरल प्रतिमांमधून मन व्यक्त होऊ लागल्याचे त्या सांगतात. एक विचार येथे मनात येतो. त्या काळात मौनात केवळ स्त्रीत्वाचीच प्रतिष्ठा होती का ? की एकूण मराठी कवितेवरच अभिजातवादी प्रवृत्तींचाही काही प्रभाव होता ? कुसुमाग्रजांच्या कवितेतील 'काही बोलाचये आहे/पण बोलणार नाही' सारख्या अनेक ओळींचे येथे स्मरण होते. त्यामुळे स्त्रियांच्या कविता अगदी सुट्या न काढता समकालीन कवी कोणती मूल्ये मानत होते, हेही पाहिले पाहिजे असे वाटते. अन्यत्र या कवितेवर प्रभाव टाकणाऱ्या कवींची चर्चा त्यांनी केलेली आहे (पृ. १९). यात बदल झाला त्याला विविध गोष्टी कारणीभूत आहेत. १९७५ नंतर आपल्याकडे पोचलेला 'पर्सनल इज पोलिटिकल' हा स्त्रीवादी विचार हे त्यातले एक ठळक कारण आहे.

इ.स. १९७५ ते २००० या कालखंडातील कवितेबाबत विवेचन करताना त्यात अपरिहार्यपणे स्त्रीवादाचा संदर्भ येतो. स्त्रीच्या पारंपरिक प्रतिमेचे पुनर्मूल्यांकन या कवयित्री करीत जातात. भोवतालचे वास्तव, प्रेमानुभव, नातेसंबंध, मातृत्व या साऱ्यांविषयीच त्यांची जाणीव अधिक डोळस होते आहे. काव्याच्या आविष्काररूपांवरही या परिवर्तनाचा परिणाम होतो आहे हे डॉ. गुंडी नेमकेपणाने दाखवून देतात. हे स्पष्ट करताना त्यावर पडू पाहणाऱ्या मर्यादांचीही त्यांनी जाणीव करून दिलेली आहे. या प्रकरणातच समाविष्ट होऊ शकला असता असा भाग 'स्त्रीवादी आणि स्त्रीकेंद्री कविता' म्हणून त्यांनी वेगळा ठेवला आहे. त्यांचे तेथील विवेचन स्त्रीवादाच्या प्रभावातील सकारात्मक अंगाचीही अधिक खोलवर जाऊन दखल घेणारे आहे. (तशी ती घेणे आवश्यकही होते.) हे लेखन पुस्तकरूपात येताना एकत्र करणे संयुक्तिक ठरले असते. इ.स. १९७५ नंतरच्या कवितेचे आकलन त्यामुळे सलग स्वरूपात समोर आले असते.

'स्त्रियांच्या काव्याचे काही पैलू' हे प्रकरण सुटे तीन लेख एकत्र करूनच आकारले आहे. वेगवेगळ्या पैलूंचा विचार असल्याने त्यांचे सुटेपण खटकत नाही. यातील 'वारसा स्त्रीत्वाचा आणि कवितेचा'. या शीर्षकाच्या भागातील आई-मुलीच्या नात्याचे बदलते

स्वरूप आणि त्याची तशीच वेगळी अभिव्यक्ती यासंबंधीचे विवेचन महत्त्वाचे आहे. स्त्रियांच्या कवितेतील एक वेगळा पदर त्यातून उलगडला जातो. पुरुषप्रधान संस्कृतीमुळे स्त्रीला वाटणारी संवादाची गरज आणि त्यामुळे कवितेतून सुरू होणारा आत्मसंवाद याबाबतचे 'शब्दवती कविता' या शीर्षकाखाली मांडलेले निरीक्षणही मार्मिक आहे.

परिशिष्टांत कवयित्रींच्या काव्यसंग्रहांची पाच परीक्षणे दिलेली आहेत. हे संग्रह चांगले आहेत. त्यांची वैशिष्ट्ये लेखिकेने नेमकी दिली आहेत, मात्र मुळातल्या शब्दमर्यादेमुळे त्यातली दोन परीक्षणे फार त्रोटक आहेत. लेखिकेकडून विश्लेषणाबाबत असलेल्या अपेक्षा त्यामुळे फारशा पूर्ण होत नाहीत. नियतकालिकांच्या मर्यादेत अधिक विवेचन त्या त्या वेळी शक्य नसले, तरी आता पुस्तकात समावेश करताना त्यात भर घालता आली असती, असे वाटते.

प्रस्तुत पुस्तकातून या कालखंडातील कवयित्रींच्या काव्याच्या स्वरूपावर चांगला प्रकाश पडतो. डॉ. गुंडी यांनीच दिलेल्या आकडेवारीच्या प्रमाणात पाहिले तर त्यापैकी निवडक काव्यसंग्रहांचाच विचार त्या येथे करू शकल्या आहेत, हे लक्षात येते. मात्र त्यांची निवड प्रातिनिधिक म्हणता येईल, अशी आहे. मूळ निबंधांना पुस्तक म्हणून एकत्रित करताना पुनर्लेखनाची गरज होती, असे वाटते. तरीही एकूण विवेचन आणि संदर्भ यामुळे प्रस्तुत पुस्तकही अभ्यासकांस उपयुक्त ठरेल, यात शंका नाही.

■

**प्रपाठक, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे** 411007. **दूरभाष** 020-25690987

## लेखनासाठी विषय

पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे :

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे.

# शब्दसंक्षेप, वाक्यसंक्षेप

द. भि. कुलकर्णी

संपा० ‘भाजी’ यांस

स०न०वि०वि०

आ० व ‘भाजी’च्या संपा०समि०च्या एक सद० मृ०श० असे आ० दो०नी मि० लिहि० संपा० टि०वा०सं० : भाजी व० २५, अं०१, हि०’०७.

अबब ! संक्षिप्त रूपात वाक्य लिहिणे किती जिकिरीचे ते आता लक्षात आले. अशा प्रयत्नात वेळ व श्रम, प्रारंभी तरी, वाचत नाहीत; वाचकासही, वाचक म्हणून असाच अनुभव येईल.

याचा अर्थ असा आहे का की, शब्दांचे संक्षेपीकरण सुलभ पण वाक्याचे संक्षेपीकरण अवघड ? पत्राच्या अखेरीस आपण ‘मो०न०ल०आ०’ असे लिहितो, हा अपवाद.

दुसरी गोष्ट : दोन व्यक्तींमधील व्यक्तिगत व्यवहारात शब्द व वाक्य यांचे संक्षेप सुसह्य ठरतील; पण व्यक्ती व समाज यांच्यातील सार्वजनिक व ज्ञानात्मक व्यवहारांत ते इष्ट व उपयुक्त ठरणार नाहीत ? मस्करी व जाहिरातकुसर म्हणून अधूनमधून फक्त ते क्षम्य ठरेल ?

पूर्वी मोडीमध्ये असे विविध संक्षेप सर्रास वापरले जात; त्याचे कारण मोडी ही लिपी सार्वजनिक नव्हती; तर ती फक्त स्वत:च्या माहितीसाठी नोंद करण्यासाठी व दोन परिचितांमधील संवादापुरती वापरली जाणारी खासगी लिपी होती.

साहेब, सार्वजनिक लेखन लेखकासाठी नसते, वाचकांसाठी असते; म्हणून तर लेखनविषयक नियम लेखकाच्या सोयीने करावयाचे नसतात; वाचकाच्या सोयीने करावयाचे असतात; जसे, ‘विशद’ व ‘विषाद’ हा भेद लेखकास जाचक वाटला तरी चालेल; तो वाचकाच्या सोयीचाच असतो. ‘सलील-सलिल’, ‘रुपे-रूपे’, ‘शिर सलामत तो पगडी पचास’ - ‘शीर सलामत तो बुगडी पचास’ - (पु०शि० रेगे) ही अशी आणखी काही उदाहरणे. लेखनविषयक नियमांचे सुलभीकरण लेखनकाराच्या अंगाने कधीही होता कामा नये; लेखन-नियमांत जितकी सूक्ष्मता व विवक्षा येईल

तितके ते लेखन वाचकाच्या दृष्टीने अर्थसुलभ होईल.

संक्षेपीकरणाची प्रवृत्ती लेखनकाराच्या अंगाने सोयीची पण वाचकाच्या, समाजाच्या अंगाने गैरसोयीची व अपायकारक आहे; सार्वजनिक व्यवहारात तिचा प्रसार होऊ देणे हितकारक नाही.

आता संक्षेपचिन्हाबाबत : चोखंदळ लेखक-मुद्रक कटाक्षाने संक्षेपचिन्ह (०) वापरतात; एरवी अधिकांश लेखक-मुद्रक संक्षेपचिन्हाऐवजी पूर्णविराम चिन्हच (.) वापरतात. माझ्या एका लेखनिकाला मी संक्षेपचिन्ह द्यायला सांगितले त्याचा परिणाम असा झाला की तो पूर्णविराम व अनुस्वारही पोकळ देऊ लागला; दुसऱ्या एका लेखनिकाने इंग्रजी लिहितानाही संक्षेपचिन्ह वापरणे सुरू केले. एकदा माझ्या टेलिफोन डायरीत 'डो बो कुलकर्णी' अशी नोंद मला दिसली. ''हा कोण ?'' म्हणून विचारले तर महाशय म्हणतात काय, ''सर, हे तुमचंच नाव.'' त्याने नोंद केली होती, ''KULKARNI, DO BO''

विरामचिन्हांचा विचारही लेखन-विषयक नियमांमध्ये नीट व्हायला हवा आहे.

तुम्ही हेमाडपंती लिपीतील काही शब्दांची संक्षिप्त रूपे दिली आहेत; जसे, सो॥, वी॥, मु॥, इत्यादी. त्यावरून असे दिसते की मोडीमध्ये एक दंड (।) व दोन दंड(॥) ही चिन्हे संक्षेपचिन्ह म्हणून योजिली जात. आपण त्याऐवजी (०) चिन्ह वापरतो; आता या पर्यायी चिन्हाचाही विचार व्हायला हवा - खासगी भाषा व्यवहारासाठी.

ज्येष्ठांस नमस्कार, धाकट्यांस आशीर्वाद.

आपला स्नेहाकांक्षी

दत्ताजी भिकाजी कुलकर्णी ऊर्फ दभि

■

'वसुधा', ई-004, डीएसके विश्व, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे 41. दूरभाष (020)24380894

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- ☐ **'छंद:शास्त्रीय समीक्षा'** - डॉ. शुभांगी पातुरकर. दिलीपराज प्रकाशन, पुणे ३०. २००८. पृष्ठे २०४. किंमत रु. २००/-
- ☐ **'महाराष्ट्र आणि मराठी भाषा'** - डॉ. गं. ना. जोगळेकर. श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०. २००८. पृष्ठे १६४. किंमत रु. २००/-
- ☐ **'आधुनिक जर्मन कविता'** - अनुवादक - भगवान ठग. महाराष्ट्र अनुवाद परिषद प्रकाशन. बुलडाणा. २००८. पृष्ठे ८०. किंमत रु. १२५/-
- ☐ **'जाहिरातींचे शैलीशास्त्र'** - डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी. श्री मंगेश प्रकाशन, नागपूर. २००७. पृष्ठे ३०८. किंमत रु. १५०/-

# मराठी भाषेतील सौजन्य

**डॉ. प्र.चिं. शेजवलकर**

'भाषा आणि जीवन' चा उन्हाळी अंक (एप्रिल २००८) आत्ताच वाचला. मराठी भाषा सौजन्यपूर्ण नाही याविषयी अच्युत ओक यांनी लिहिलेलं मत तितकसं बरोबर नाही, असं मला वाटतं.

आपण इतरांशी बोलताना 'जरा पाणी देता का ?','जरा ती फाईल मला पाठवता का ?' या अशा स्वरूपाच्या वाक्यात आपण 'जरा' हा शब्द वापरतो. 'कृपया' या शब्दाला 'जरा' हा प्रतिशब्द आहे. 'मी बोलू का ?', 'मी भेटायला येऊ का ?' 'अभिनंदन', 'वाढदिवसाच्या शुभेच्छा' अशा तऱ्हेचे कितीतरी शब्द आपण नित्याच्या व्यवहारात वापरतो. या शब्दांमध्ये सौजन्य असतं. हे या शब्दांचं सौजन्य मुद्दाम वर्गात शिकवावं लागत नाही. घरात चांगले संस्कार असले तर मुलं आणि मुली हे शब्द नेहमी वापरतात. ज्येष्ठ व्यक्तींना आपण 'माननीय' किंवा 'आदरणीय' असे शब्द नेहमी वापरतो. माझ्या म्हणण्याचा आशय इतकाच की, मराठी भाषा सौजन्यपूर्ण आहे; पण बरीच मराठी माणसं वृत्तीने सौजन्यपूर्ण नसतात. आपल्या मनात दुसऱ्यांबद्दल आस्था आणि आदर असला तर आपण सौजन्यपूर्ण भाषेतच बोलतो.

तसेच आपल्यापेक्षा मोठ्या व्यक्तीला आपण 'आहो' 'जाहो' म्हणतो, 'तुम्ही', 'तुमचा', 'आपण' असे शब्द वापरतो तेही सौजन्य म्हणूनच. नाही तर 'अरे-तुरे'चीच भाषा सगळीकडे वापरली गेली असती.

आज्ञार्थी वाक्यांबद्दल सांगायचं झालं तर, लहान मुलांशी बोलताना घरातले लोक, विशेषतः आई, मुलाला 'अरे राजा (बाबा, सोन्या, बाळा अशी वेगवेगळी विशेषणे लावून आज्ञा करते) अंघोळ करून घे' ही विशेषणे प्रेमळ आणि सौजन्यपूर्णच असतात. उलट आपण मराठी भाषेत लहान मुलांशीसुद्धा सौजन्यपूर्ण भाषेतच बोलतो. ■

संचालक, एएसएम इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट एज्युकेशन, पुणे 411004.

# वऱ्हाडी बोलीची उच्चार प्रवृत्ती

रावसाहेब काळे

[ संदर्भ : 'पूर्व खानदेशच्या बोलींचा परस्परांवर प्रभाव : एक अभ्यास' - वासुदेव सोमाजी वले, 'भाषा आणि जीवन' २६ : १ (उन्हाळा २००८).]

वले यांनी अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी ह्या बोलींमधील साम्य दाखविताना जी उदाहरणे दिली त्यांचा वऱ्हाडी बोलीसंबंधी विचार पुढीलप्रमाणे :

(१) बहिण-बहिन : वऱ्हाडीत मूर्धन्य 'ण' ऐवजी दन्त्य 'न'चा उच्चार होता. मात्र, प्रमाण मराठीतील काही शब्दांत स्वरांतर्गत 'ह' आल्यास वऱ्हाडीत त्याचा लोप होतो.. 'बहीण' हा उच्चार वऱ्हाडीत 'बईन' असा आढळतो. (याप्रमाणे तहान > तान, नाही-नाई.)

(२) विळा-इया : 'इया' असा उच्चार अमरावतीकडे क्वचित तर अकोल्याकडे आढळत नाही. 'विळा' या शब्दाचा उच्चार मोठ्या प्रमाणात 'इवा' असा आढळतो.

(३) येथे/इथे - अढी/अढी
तेथे - तढी/तढी
कोठे - कुढी/कुढी

'येथे' ह्या प्रमाण मराठीतील क्रियाविशेषणाचा उच्चार अकोल्याकडे 'अती' तर अमरावतीकडे 'अथी' असा केला जातो. अकोल्याकडून बुलढाण्याकडे आपण जसजसे जातो तसतसा 'अठी/अटी' असा उच्चार भाषिक व्यवहारात मोठ्या प्रमाणात वाढताना दिसतो.

याप्रमाणे 'अती'/'अथो'/'अठी' उच्चार केला जातो. मात्र, वरील उदाहरणातील 'अढी,' 'तढी', 'कुढी' यांचा उच्चार वऱ्हाडीत होत नाही. 'कुठी' या अर्थी वऱ्हाडीत 'कुकूळे'

(४) ऐ > अय : यासंबंधित वल्यांनी उदाहरणे दिलेली नाहीत. वऱ्हाडीत 'ऐ' या संयुक्त स्वराचा उच्चार 'इ, अइ, अय, आय्' होतो.

ऐ > ई = म्हैस > म्हीस

ऐ > अई = चैन > चईन, बैल > बईल.

ऐ > अय = मैना > मयना, पैसा > पयसा, चैतन्य > चयतन

ऐ > आय = ऐक > आयक

(५) सौदेशी : स्वतः > सोता, सरस्वती > सरसोती ही प्रक्रिया वऱ्हाडीसंबंधी योग्य आहे. मात्र, 'सौदेशी' असा उच्चार वऱ्हाडीत आढळत नाही.

(६) अ > आ : वऱ्हाडीत 'अ' या स्वराऐवजी काही शब्दात 'आ' हा स्वर उच्चारला जातो.

उदा० अजून > आजूक. मात्र, (अवजड > आवजड) आवजड ह्या शब्दाऐवजी 'भारी' हा शब्द मोठ्या प्रमाणात उच्चारात आढळतो.

'असा' ऐवजी 'आसा' उच्चार वऱ्हाडीत नाही. येथे 'अ' 'आ' होत नसून 'अ' हा स्वरच उच्चारात आढळतो. उदा. 'असं कधी घळे ? सासू जावयासाठी जळे ?' ■

मु. लोगी, पो. रिधोरा, ता. बाळापूर, जि. अकोला, बेळगाव (पिन) 444-302.
E-mail : raosaheb-kale@Rediffmail.com

---

**लेखक परिचय**

- डॉ. कल्याण **काळे :** एम.ए.,पीएच.डी.(मराठी). बार्शी, नंदुरबार, पुणे येथे अध्यापन. पुणे विद्यापीठातून प्रोफेसर व विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. २० पुस्तके, १५०पेक्षा अधिक लेख. भाषाविज्ञान, संतवाङ्मय हे विशेष अभ्यासाचे विषय. 'भाषा आणि जीवन'चे सुमारे आठ वर्षे प्रमुख संपादक.
- डॉ. बलवंत **जेऊरकर :** पुणे विद्यापीठातून हिंदी विषयात एम.ए.,एम.फिल.,पीएच.डी. विलिंग्डन महाविद्यालय, सांगली येथे हिंदीचे अध्यापन. साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त 'हम जो देखते हैं' या कवितासंग्रहाचा अनुवाद साहित्य अकादमीकडून प्रकाशित. 'दो पंक्तियों के बीच' या साहित्य अकादमी पारितोषिकप्राप्त कवितासंग्रहाचा अनुवाद प्रकाशनाच्या वाटेवर.
- डॉ. विद्यागौरी **टिळक :** मराठी विषयात एम.ए.,एम.फिल.,पीएच.डी. सोमेश्वरनगर (जि.पुणे) येथे १९८६ ते १९९६पर्यंत अध्यापन. १९९६पासून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक. 'मराठी वाङ्मयाची सद्यःस्थिती' (सहसंपादन), 'वाङ्मयेतिहास-लेखन - स्वरूप आणि संपादन' (संपादन),'समीक्षा-विविधा'(संपादन) ही प्रकाशित पुस्तके. कथा, कविता, लेख इ०स्फुट लेखन.
- डॉ. माधुरी **दाणी :** एम.ए.,पीएच.डी. मुधोजी महाविद्यालय, फलटण येथे मराठीचे अध्यापन. 'ओवी आईची' हे ओवीगीतांवरील पुस्तक प्रकाशित. दोन कथास्पर्धांत पारितोषिक. 'माहेर', 'मानिनी', 'मधुरा' इ० नियतकालिकांमध्ये कथा व लेख प्रकाशित.
- लीला **दीक्षित :** एम.ए.,पीएच.डी. निवृत्त प्राध्यापिका. कथा, कादंबरी, समीक्षा, बालसाहित्य, संपादन इत्यादी प्रकारचे लेखन. राज्यसरकारसह इतरही अनेक पुरस्कार प्राप्त. 'शतकातील बालकविता' हे संपादन. अखिल भारतीय मराठी बालकुमार साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष (२००५). 'स्त्री साहित्याचा मागोवा' या बृहत्-संशोधन प्रकल्पाच्या एक संपादक. साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या विश्वस्त.

---

- डॉ. सौ. शुभांगी अविनाश **पातुरकर :** 'मराठी मुक्तछंद' या विषयावर पीएच.डी. त्याच शीर्षकाचे पुस्तक १९९९मध्ये प्रकाशित. त्याला ग्रंथोत्तेजक सभा (पुणे), विदर्भ साहित्य संघ (नागपूर) यांचा म.म.वा.वि मिराशी पुरस्कार व विदर्भ संशोधन मंडळ (नागपूर) यांचा डॉ. बाळाजी पुरस्कार असे पुरस्कार. 'मंतरलेले दिवस' (२००३) हा ललितलेखांचा संग्रह प्रकाशित.
- डॉ. विद्या वासुदेव **प्रभुदेसाई :** एम.ए.,एम.फिल.,पीएच.डी. नाईक महाविद्यालय, फर्मागुडी (फोंडा) येथे उपप्राचार्य. मराठीच्या प्रपाठक. अनेक नियतकालिकांतून संशोधनपर लेख प्रकाशित.
- डॉ. सुमन **वेलवलकर :** शिवाजी विद्यापीठातून एम.ए.,पीएच.डी. सर्व परीक्षांत प्रथम क्रमांक व अनेक पारितोषिके. राष्ट्रीय शिष्यवृत्तीने सन्मानित. पश्चिम विभागीय भाषाकेंद्र (पुणे) येथे अमराठी विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन. तेथील प्राचार्यपदावरून निवृत्त. 'वेलभाषा', (भाषाविषयक स्फुटलेखन) व 'मराठी शारदियेच्या चंद्रकळा' (संपादन) ही पुस्तके प्रकाशित.
- प्रकाश अर्जुन **भामरे :** एम.ए.,बी.एड.,एम.फिल. सेट व नेट परीक्षा उत्तीर्ण. मराठी विभाग प्रमुख, ग.तु. पाटील महाविद्यालय, नंदुरबार. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सभासद. प्रथम व द्वितीय वर्ष, कला आणि प्रथम वर्ष वाणिज्य यासाठीच्या पाठ्यपुस्तक संपादन मंडळाचे सभासद. सामाजिक कार्यात सहभाग.
- शरदिनी **मोहिते (वावर) :** एम.ए. (मराठी व संस्कृत). ६० नियतकालिकांत लेखन. समाज-शिक्षणमालेमध्ये साहित्य. इतिहास. भाषा. भूगोल. मानसशास्त्र इ० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफ्लर). 'देवदास' व 'परिणीता' (शरचंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.
- शुभांगी सीताराम **रायकर :** (जन्म १९४१) इंग्लिश भाषा व वाङ्मय या विषयात एम.ए.,एम. फिल.,पीएच.डी.(पुणे विद्यापीठ). फर्ग्युसन महाविद्यालय. पुणे येथे पदवी व पदव्युत्तर वर्गांना इंग्लिशचे ३२ वर्षे अध्यापन. 'जेजुरी : ए कॉमेंटरी ॲण्ड क्रिटिकल पर्स्पेक्टिव्हज' व 'इन्टरॉगेटिंग द राज' ह्या पुस्तकांचे संपादन. अनेक लेखांचे इंग्रजीतून मराठीत व मराठीतून इंग्रजीत भाषांतर. सध्या गणेश देवींच्या एका पुस्तकाचे भाषांतर करण्याचे काम सुरू आहे.
- यास्मिन **शेख :** एम.ए.,बी.टी.(मराठी-इंग्लिश).मुंबईतील साउथ इंडियन एज्युकेशन सोसायटीच्या महाविद्यालयात मराठीचे २५ वर्षे अध्यापन. त्यांपैकी सहा वर्षे विभागप्रमुख. बालभारतीच्या मराठी विषयाच्या पुस्तकाच्या सात वर्षे सहसंपादक. 'मराठी लेखन मार्गदर्शिका' व 'मराठी शब्दलेखन कोश' ही पुस्तके प्रकाशित. 'अंतर्नाद' या मासिकाच्या व्याकरण-सल्लागार.
- डॉ. शंकर **सखाराम (पाटील) :** एम.ए.,बी.एड., आचार्य व मराठे महाविद्यालय(चेंबूर) येथे मराठीचे अध्यापन. चित्रकार. मुद्रितशोधक. आकाशवाणी-मान्यताप्राप्त गीतकार. माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या पाठ्यपुस्तकांत संपादक म्हणून सहभाग. दलित ग्रामीण शब्दकोशाच्या संपादक मंडळाचे सभासद. अनेक नियतकालिकांत स्तंभलेखन. तीन कादंबऱ्या. दोन कवितासंग्रह. तीन कथासंग्रह. तीन ललित-लेखसंग्रह. सहा बालकथासंग्रह आणि तीन बालकवितासंग्रह प्रकाशित. अनेक पुरस्कार.
- प्रा. अविनाश खंडो **मप्रे :** एम.ए.(इंग्लिश). विलिंग्डन महाविद्यालय व चिंतामणराव व्यापार महाविद्यालय. 'इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट' येथे ३७ वर्षे इंग्रजीचे अध्यापन. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य व काही काळ पूर्णवेळ कार्यवाह. एकवीस ग्रंथांमध्ये लेख समाविष्ट. 'सत्यकथा', 'प्रतिष्ठान', 'ललित', 'नवभारत', 'समाज प्रबोधन पत्रिका', 'अभिधानंतर', 'पर्नेस्ट', 'खेळ', 'केंटरबरी रिव्ह्यू' इत्यादी नियतकालिकांतून समीक्षालेखन. विविध समित्यांचे सभासद. चर्चासत्रे व परिसंवादांमध्ये सहभाग. अनेक व्याख्यानमालांमध्ये व्याख्याने.

